# गोस्वामी तुलसीदास




लेखिका : डॉ. कमल वैद्य

# अनुक्रमणिका



---

**टीप :** या ग्रंथाची पहिली आवृत्ती निघून बरीच वर्षे झाली. मराठीत लिहिलेले गोस्वामी तुलसीदासांचे एकही विश्वासार्ह चरित्र वाचकांसाठीं उपलब्ध नाही. हे लक्षांत घेऊन या ग्रंथाची ही दुसरी आवृत्ती श्री. ना. वि. काकतकर 'संतकृपा' यांच्या अनुमतीने काढली जात आहे.

**- डॉ. श्री. कमल वैद्य**

# तुलसी पत्र

*श्री वाल्मीकचि झाला श्री तुलसीदास राम-यश गाया। तरिच प्रेमरसाची खाणी*
*वाणी तशीच वश गा या॥ (मोरोपंत)*
*संसार अपार के पार को सुगम रूप नौका लिए।*
*कलि कुटिल जीव निस्तार हित बालमीकि तुलसी भए॥*
*(भक्तमाल, छप्पय १२९ नाभादास)*

भक्त शिरोमणी श्री गोस्वामी तुलसीदास यांचे नाव ज्यांनी ऐकले नाही असा मनुष्य भारतवर्षात विशेषत: उत्तर भारतात तरी कोणी नसेल. भारतीय जनतेने ज्यांचे ऋण निरंतर मान्य केले आहे अशा मोजक्या व्यक्तींत त्यांचा समावेश होतो. ज्यांच्यामुळे जगात भारताची प्रतिमा उंचावली, आंतरराष्ट्रीय कीर्ती प्राप्त झाली, अशामध्ये गोस्वामी तुलसीदास हे एक महान व्यक्तिमत्त्व होते. अनेक परदेशीयांनी गोस्वामींच्या जीवनाविषयी आणि त्यांच्या 'रामचरितमानसा' विषयी अभ्यासपूर्ण लेखन केले असून, त्यात एच्. एच्. विल्सन, गासी द तासी, एफ्. एस्. ग्राऊज, सर्वांत महत्त्वपूर्ण कार्य करणारे सर जॉर्ज आर्थर ग्रियर्सन, रेव्हरंड ई. ग्रीब्ज, डॉ. विंसेट स्मिथ, रेव्हरंड एफ्.ई.के. डॉ. कारपेंटर, डॉ. कामिल बुल्के, प्रा. बारान्निकोव, फ्रेडरिक पिनकाट, एटकिन्स, श्री. जॉर्ज सिब्रा, डॉ. कुं. शार्लोत बोदविल, किसेन की, जे. एम. मॅक्फी इत्यादी प्रमुख आहेत.

भारतीय संशोधकात, आदरणीय मिश्रबंधू, डॉ. श्यामसुंदरदास, पं.रामचंद्र शुक्ल, बाबू शिवनंदन सहाय, श्री. रामदास गौड, लाला सीतारामजी, श्री. ब्यौहार राजेंद्रसिंह, श्रीसद्गुरुशरण अवस्थी, डॉ. बलदेवप्रसाद मिश्र, श्री. सीताराम शरणजी, श्री. भगवान प्रसाद, डॉ. माताप्रसाद गुप्त, पं.चंद्रवली पांडेय, श्री. रजनीप्रसाद शास्त्री, श्री. राजाराम रस्तोगी, डॉ. रामदत्त भारद्वाज, 'मानस पीयूष' चे श्री अंजनीनंदन शरणजी, आणि कित्येक ज्ञात, अज्ञात भारतीयांनी तुलसीदासांसंबंधी संशोधन करण्यात आपले उभे आयुष्य वेचले आहे. महाराष्ट्रात मात्र गोस्वामी तुलसीदासांच्या साहित्याचा अभ्यास व संशोधन करणाऱ्या व्यक्ति अगदी थोड्या आहेत. श्री. जामदार, श्री. पू. प्रज्ञानानंद सरस्वती स्वामी महाराज, डॉ. श्रीखंडे, श्री. ग. दि. माडगूळकर, सौ. नलिनी साधले (मानसाचा संस्कृत अनुवाद), श्री. दसनूरकर, श्री. सुलोचना खांडेकर, डॉ. अशोक कामत इत्यादी मोजकीच नावे घेता येतील.

एकंदरीत पाहता जनमानसावरील गोस्वामींचा प्रभाव त्यांच्या हयातीत होता त्यापेक्षाही उत्तरोत्तर वाढतच असून, त्यांची ख्याती आणि समादर यास आंतरराष्ट्रीय व्यापकता प्राप्त झाली आहे. ही किमया कशी घडली तेच आता पाहू.

Tulsidas was not born great but made himself so. (Channdrakumari Handoo)

'नर करनी करे तो नरका नारायण हो जाय'

चिकाटी आणि प्रयत्न यांनी विद्वता वाढू शकते आणि वैशिष्ट्यपूर्ण व्यक्तिमत्व घडविता येते. सामान्य माणूसही अशा रीतीने आपल्या आयुष्याचे मोल वाढवू शकतो; आयुष्याचे सोने करू शकतो. एकनिष्ठपणे एखाद्या उत्तम ध्येयाचा पाठपुरावा करणे ही बाब अत्यंत महत्त्वाची ठरते. प्रत्येक जीव हा ईश्वरी अंश असल्याने, कुणीही व्यक्ती खरे पहाता सामान्य असूच शकत नाही. ईश्वरी अंश या नात्याने जीवाची शक्ती अपरिमित आणि अतर्क्य आहे. तिचा पूर्णत्वाने विकास करणे ही शक्य कोटीतील गोष्ट आहे. पण आत्मविश्वासाचा अभाव, उत्साहहीनता, ध्येयशून्यता यामुळे आपण मागे पडतो, आणि या जगातील यथायोग्य स्थान आपण प्राप्त करून घेत नाही. गोस्वामी तुलसीदासांसारख्यांना हे जमते आणि म्हणूनच ते पूजनीय ठरतात!

त्याग आणि प्रसिद्धीपराड्मुखता ही भारतीय संस्कृतीची गौरवपूर्ण वैशिष्ट्ये आहेत. प्राचीन परंपरा या आदर्शगुणांनी युक्त असून संतकवींमध्ये ही प्रवृत्ती विशेष प्रकर्षाने दिसून येते. सर्वच संत महात्मे हे प्रसिद्ध पराड्मुख असल्याने असे दिसून येते की, त्यांनी अफाट वाङ्मय निर्मिती केली असली तरी त्यात आपले जन्मस्थान, जन्मतिथी, किंवा परिवार इत्यादी गोष्टींचा उल्लेख अभावानेच असतो. तसेच समकालीनांच्या साहित्यातही त्यांचे रूपगुणवर्णन आढळले तरी स्थलकालनिर्देश असतेच असे नाही. त्यामुळे त्यासंबंधी निश्चित माहिती मिळणे बरेचवेळा अशक्यप्राय ठरते. अलीकडे या बाबत संशोधनाचे प्रयत्न होत असले तरी आंधळ्यांनी हत्तीचा जो अवयव हाती लागेल त्यास अनुसरून त्याचे वर्णन करावे, तसे प्रत्येक संशोधकाचे मत भिन्न असते. एवढेच नव्हे तर प्रत्येकजण हिरिरीने आपापले मत मांडून त्यासाठी भरपूर पुरावे उपलब्ध करून देताना आढळतो. समग्र हत्तीचे डोळस दर्शन न झाल्याने त्याचे यथार्थ ज्ञान ज्याप्रमाणे होत नाही, त्याप्रमाणे आपलीही अशी अवस्था होते की या मतामतांच्या गलबल्यांत सुस्पष्ट असे चित्र आपल्या डोळ्यासमोर उभे राहातच नाही. आपल्याकडे ज्याप्रमाणे ज्ञानेश्वर एक की दोन, आळंदीचे की आपेगावचे इत्यादी वाद आहेत, तसेच गोस्वामी तुलसीदासांच्या संदर्भातही आढळून येतात.

गोस्वामी तुलसीदासांनी विपुल वाङ्मय निर्मिती केली असली तरी त्यात आत्मोल्लेख फारच थोडे आहेत. त्यांच्या साहित्यावरून त्यांच्या व्यक्तिमत्त्वाचा शोध घेता आला तरी जन्मकाळ, जन्मस्थळ, परिवार इत्यादी संबंधी फारशी माहिती उपलब्ध होत नाही. त्यांच्या समकालीनांच्या साहित्यावरूनही परिवारासंबंधी फारच थोडी माहिती मिळते. त्यांची म्हणून जी चरित्रे आतापर्यंत प्रकाशात आली आहेत त्यात पारस्पारिक सामंजस्य नाही. काही चरित्रे तर विचित्र घटना आणि चमत्कार यांनी परिपूर्ण असून त्यातील कित्येक घटना ऐतिहासिक दृष्ट्या सत्याच्या कसोटीवर टिकत नाहीत. शिवाय चमत्कारांच्या अतिरिक्त वर्णनाने प्रामाणिकता नष्ट होते ती वेगळीच.

अलिकडे अन्तःसाक्ष्य आणि बहिःसाक्ष्य यावर आधारित असे चरित्र लेखनाचे जे अनेक प्रयत्न हिंदी साहित्यिकांनी केले आहेत त्यावरून जी माहिती हाती लागली त्यावर आधारित चरित्रच येथे देण्यात येत आहे.

भिन्न भिन्न मतभेदाची दखल घेऊन सर्वसामान्यपणे मान्य असलेल्या गोष्टींचा स्पष्ट उल्लेख केला आहे. कुणाचेही चरित्र लिहिताना त्या व्यक्तीने केलेली साहित्यनिर्मिती विचारात घ्यावी लागते. साहित्याचा विचार केल्याशिवाय जीवनाचे संपूर्ण दर्शन घडतच नाही. शरीराबरोबर आत्म्याचे साहचर्य असते. म्हणूनच सौंदर्याची परिपूर्णता होते, म्हणूनच जीवनातील स्थूल घटनांबरोबर भावसौंदर्याचे दर्शन घडल्यानेच जीवनसौंदर्याची परिपूर्तता होते. तसेच त्यांत जे आत्मोल्लेख मिळतात ते अंतःसाक्ष्य म्हणून पूर्ण विश्वसनीय असतात. तुलसीदासांच्या साहित्यातील आत्मोल्लेखांचा या दृष्टीने भरपूर फायदा घेतला आहे. गोस्वामींचा ज्यात उल्लेख आहे अशा समकालीनांच्या आणि नंतर निर्माण झालेल्या कृति, तसेच राजापुर, अयोध्या, काशी, सोरो येथील दंतकथा व इतर प्राप्त झालेली साधन सामुग्री ह्यांचा अन्तर्भाव बहिःसाक्ष्य मध्ये केले जातो.

१. भवानीदासकृत गोसाई चरित २. वेणीमाधवदासकृत मूल गोसाई चरित ३. तुलसीचरित (रघुवरदासकृत) ४. नाभादासकृत भक्तमाल ५. तुलसीसाहिब का आत्मचरित (घट-रामायणांतर्गत) ६. दोहा रत्नावली.७. भविष्यपुराण ८. श्री. अविनाशरायकृत 'तुलसी प्रकाश' ९. श्रीकृष्ण दत्तमित्रकृत 'गौतमचंद्रिका' १०. भक्तमालची प्रियदासी टीका ११. सौ बावन वैष्णवन की वार्ता १२. मुरलीधर चतुर्वेदी कृत रत्नावली-चरित्र हे ग्रंथ, तसेच राजापूर, अयोध्या, काशी आणि सोरो येथील उपलब्ध सामग्री, हा आहे पाया! थोडक्यात म्हणजे 'फोडिलें भांडार, धन्याचा हा माल । मी तव हमाल, भारवाही! ही वस्तुस्थिती आहे. तेव्हां यांतील सारग्रहण करून दोषासाठी क्षमा करावी अशी नम्र विनंती आहे.

ह्या चरित्राचे लेखन करण्यास संदर्भ ग्रंथ पुरवून सौ. वसुधा परांजपे व प्रा. डॉ. आंबर्डेकर ह्यांनी जे बहुमोल सहाय्य केले, तसेच प्रा. डॉ. आंबर्डेकर यांनी आपला बहुमोल वेळ खर्च करून लिखाण वाचून काही दुरुस्त्याही सुचविल्या त्याबद्दल मी त्यांची आभारी आहे.

ज्यांच्या कृपाशीर्वादाने तुलसीसाहित्याची गोडी लागली, त्या श्री. सद्गुरु प्रज्ञानानंद सरस्वती स्वामी महाराजांच्या आणि पतिदेव कै. डॉ. बाळकृष्ण श्रीपाद वैद्य यांच्या चरणी नम्र अभिवादन करून आणि सर्व वाचकांना सीताराममय जाणून त्या सर्वांच्या चरणी वाहिलेले हे 'तुलसी पत्र' ते आवडीने, कृपालुपणे स्वीकारतील अशी खात्री वाटते.

**- डॉ. श्री कमल वैद्य.**

# तुलसीवंदन

वंदन तुलसीदास पदपद्मां ।
कृत ज्यानी 'मानस' सुखसद्मा ॥ १ ॥
भगिरथ तुलसी रामरति गंगा ।
महिं आणुनि कृत भवभयभंगा ॥ २ ॥
हात जोडते, पदर पसरते ।
गोस्वामी, मी तुम्हां विनविते ॥ ३ ॥
वचन मनी मी तुमचे धरते ।
दास, थोर रामाहुनि गणते ॥ ४ ॥
जरि मी कपटि कुशील नि वेडी ।
'मानसि' मजला अपूर्व गोडी! ॥ ५ ॥
वचनें तुमच्या कार्य साधते ।
दृढ विश्वासा, मनिं वागविते ॥ ६ ॥
परहितरत, तुम्हिं दीनदयाळू ।
मजसाठी विनवा कनवाळू ॥ ७ ॥
निजप्रभुला इतुके सांगावे ।
एक दीन अति वाट पहाते ॥ ८ ॥

दोहा
वचने निज प्रिय तुलसीच्या, प्रभू कृपा करतील।
हीन दीन अन् अज्ञ अशा 'कमा' स हृदिं धरतील॥

॥१॥

# तुलसीदासकालीन परिस्थिती

गोस्वामी तुलसीदास आणि एकनाथ महाराज हे समकालीन होते. विक्रम संवत् १५५४ ते वि.सं. १६८० हा तुलसीदासांचा काळ गणला जातो. ह्याच वेळी महाराष्ट्रात एकनाथ महाराज अवतीर्ण झाले. प्रत्येक विचारवंत, लेखक, कवी आणि प्रतिभासंपन्न व्यक्ती यांच्याबाबत असे दिसून येते की, त्यांच्या साहित्यात तत्कालीन परिस्थितीचे चित्रण कोठे ना कोठे आलेले असते. समकालीन परिस्थितीचा प्रभाव त्या व्यक्तीवरही पडतो आणि त्या काळातील समस्यांकडे लक्ष वेधले जाऊन, त्यातून मार्ग काढण्याचा प्रयत्न ती व्यक्ती करते. डॉ. भगीरथ मिश्र म्हणतात, 'कवि परिस्थिति विशेषमे उत्पन्न होता, बढता, संस्कार ग्रहण करता और उस परिस्थितीयोंको अपनी रचानाओमें प्रतिबिंबित करता है।'

## राजकीय परिस्थिती

तुलसीदासांच्या प्रादुर्भावाच्या वेळी समाज संक्रमणकालीन अवस्थेत होता. या काळांत दिल्लीच्या सिंहासनावर हुमायून, सूरवंश (शेरशहा), परत हुमायून, अकबर आणि जहांगिर यांची कारकीर्द होती. सन १५४० मध्ये शेरशहाने हुमायूनकडून राज्य जिंकून घेतले, ते इ.सन १५५५ मध्यें हुमायूनने परत मिळविले. ई. सन १५५६ मध्ये त्याच्या पश्चात् अकबर आणि ई. सन १६०५ मध्ये अकबराच्या पश्चात् जहांगिर राज्यावर आला. तो ई. सन १६२७ पर्यंत राज्यावर होता. तुलसीदासांचे देहावसान ई. सन. १६२३ (वि.स.१६८०) मध्ये झाले. म्हणजेच मुसलमानी सत्तेचा जवळ जवळ शंभर (१००) वर्षांचा अनुभव तुलसीदासांच्या जमेस होता.

या काळात जो सतत संघर्ष सुरू होता, त्यामुळे प्रजेस अत्यंत कष्ट सहन करावे लागले. अकबराने ई. सन. १५५६ ते १६०५ ई. सन पर्यंत राज्य केले. त्याची प्रथम कारकीर्द फार त्रासाची गेली. बहराम खाँ ने उन्मत्त बनून अनन्वित अत्याचार केले. अकबराने सत्ता हाती घेतल्यावरही तो महत्त्वाकांक्षी असल्याने, सर्व भारतभर शासन करण्याच्या इच्छेने त्याच्या शासनकालांतील अधिकांश राज्यविस्तारात गेला. शिवाय तो सत्प्रवृत्त असला तरी त्याचे अत्याचारी सरदार प्रजेवर अत्यंत जुलूम करीत. संतमहंतांची तसेच सर्वसामान्य जनतेची सरसकट हत्या केली जाई. स्त्रियांची विटंबना, धर्मस्थानांचा विनाश आदि कृत्याने त्यांनी पृथ्वीचा नरक करून सोडला होता. (केम्ब्रिज हिस्ट्री ऑफ इंडिया पृष्ठ ८२) शिवाय 'अकबर नामा' मध्ये अबुलफजलने ई. सन. १५९५ ते १५९९ ई. सन पर्यंत भयंकर दुष्काळ पडल्याचे आणि त्यातच सन १५९७ मध्ये प्लेगचा प्रादुर्भाव झाल्याचे वर्णन केले आहे. जहांगिरच्या वेळीही ई. सन. १६१४ ते १५ दुष्काळ पडला आणि पुन्हा ई.सन. १६१६ ते ई. सन. १६२४ पर्यंत प्लेगचा वरचेवर प्रादुर्भाव झाला. सर्व दुआबांत (गंगायमुनेच्या खोऱ्यांत) प्लेग पसरला. पश्चिमेस लाहोर, काश्मीरपर्यंत तर पूर्वेस बनारसपर्यंत त्याने पाय

पसरले. या भयानक प्लेगने प्रतिदिन एक हजार व्यक्ती मरत होत्या. (हिस्ट्री ऑफ् जहांगीर, वेनीप्रसाद, पृष्ठ २९७)

प्रत्येक प्रांतात अलग शासन, एवढेच नव्हे तर प्रत्येक नगरात, दुर्गात वेगळे शासन होते. पदलोभी राजांनी अकबराचे आधिपत्य स्वीकारून आपल्या कन्या, बहिणी त्यास दिल्या. व्यक्तिगत सुखाचा विचार बळावून धर्माभिमान नष्ट झाला. थोडक्यांत युद्ध, षड्यंत्र, दुष्काळ आणि प्लेग यामुळे लोकांची दुर्दशा झाली. अकबर, जहांगीर न्यायी, उदार असले तरी अत्यंत विलासी होते. शिवाय निरंकुश सत्तेमुळे कधी कधी तेही अत्यंत जुलूम करीत. दुआबाच्या प्रदेशांत सर्वाधीक अत्याचार झाले. तुलसीदास या दुआबाच्या प्रदेशातच होते. त्यांनी तत्कालीन परिस्थितीचे वर्णन त्यांच्या ग्रंथात केले आहेच.

"कलियुगांत गोंड आणि गँवार पृथ्वीचे राजे होत आहेत आणि यवन म्लेंच्छादि बादशाह होत आहेत. त्यांच्या राजनीतीत साम, दाम, भेद यांचा प्रयोग नसून, केवळ कठोर दंडाचाच प्रयोग होत आहे. काल हा गोलंदाज आहे, पृथ्वी ही तोफ आणि कराल अनीती ही दारू आहे. पाप हा पलिता असून राजा हाच कठोर आणि जड गोळा आहे." (अर्थात् काल फिरता असून तो दुष्ट राजाद्वारेच प्रजेचा नाश करतो आहे.) (दोहावली ५१३, ५१५, ५५९ वगैरे पहावे.)

## सामाजिक परिस्थिती

राजकीय क्षेत्राबरोबर सामाजिक आणि धार्मिक क्षेत्रातही अंदाधुंदी माजली होती. 'देवालये, तीर्थक्षेत्रे आणि पवित्र पुरी यांत सर्वत्र अत्यंत भ्रष्टाचार आणि भ्रष्ट वातावरण पसरले असून जणु त्या स्थानी कलियुग आपल्या सर्व समाजासह नाकेबंदी करून शोभत आहे.' (दोहावली ५५८) "हा काळ सांप्रत अशासाठी प्रसिद्ध होऊ लागला आहे की, याकाळी लोक कामधेनू विकून गाढवी खरेदी करीत आहेत. दिवसेंदिवस दरिद्रता, दुष्काळ, दुःख, पाप आणि अराजक यांची वेगाने वृद्धी होत असून सुख आणि सुकृत यांचा संकोच होत आहे. घोर पातकी जुलूम जबरदस्तीने आपापले काम साधून घेत आहेत आणि सज्जनांना त्रास भोगावा लागत आहे. पहारेकरीच चोर बनले आहेत. सर्व लोक धड जागत नाहीत की धड निजत नाहीत; जीवन व्यर्थच घालवीत आहोत. दुःख आणि रोग यांनी लोक रडत आहेत. राजा, रंक, रागी, विरागी, भाग्यशाली, भाग्यविहीन सर्वच जळत आहेत. सर्व वर्णांनी धर्मत्याग, आश्रमत्याग केला आहे. कुवासनांनी कर्म आणि उपासना यांचा विनाश झाला आहे. दंभी लोकांनी विरागी वेष धारण करून व ज्ञानी लोकांप्रमाणे भाषण करून जगास फसविले आहे. लोक वेदोक्त मार्ग सोडून कुमार्गास लागून नाना वाईट चाली ग्रहण करीत आहेत. राजे निर्दय आणि अधिकारी जुलमी आहेत. तीर्थास लोक जातात पण ज्ञान आणि वैराग्य यांचे नांवही नाही. सर्वत्र ढोंग आणि आडम्बर यांचे साम्राज्य पसरले आहे."

"सर्व कारागिर, कलावंत आपली कला पोटासाठी शिकतात आणि विकतात. अनेक गुण त्यासाठीच ग्रहण करतात. लोक पोटासाठीच धर्माधर्म करीत आहेत. एवढेच नव्हे तर पोटासाठी मुलगा, मुलगीही विकत आहेत."

"किसान शेती करू शकत नाही. भिकाऱ्यास भीक मिळत नाही. व्यापाऱ्यास व्यापार-धंदा वा नोकरी मिळत नाही. जीविकाहीन लोक दु:खी, चिंताग्रस्त होऊन कोठे जावे, काय करावे, असे परस्परास विचारीत आहेत."

"वंश मर्यादा, सत्कर्म, ऐश्वर्य, सुयश, सौंदर्य आणि गुण हे यौवन ज्वराने जळून जात आहेत. राजकाज कुपथ्य असून त्यामुळे येणारे ऐश्वर्यभोग हे रोगाप्रमाणे आहेत; पण लोक हे जाणून घेत नाहीत. विद्वान् लोक ईश्वरमहिमा न जाणून हवे ते बडबडतात. लोक बोरीबाभळी लावून त्यास राखण्यासाठी कल्पवृक्ष तोडून त्याचे कुंपण करीत आहेत. हरिश्चंद्र, दधीचि यांना लोक शिव्या देऊन स्वत: मात्र चणे खाल्ले तरी हात चाटीत आहेत. लोक स्वत: महापातकी असून हरिहरांचा मात्र उपहास करीत आहेत. दंभी साधूंच्या हृदयांत वास्तविक धन, धाम आणि पृथ्वीची लालसा अग्नीप्रमाणे भडकलेली आहे, पण मुखाने 'राम-नामा' चा घोष करीत बऱ्यावाईट शेकडो उपायांनी ते शरीरपालन करीत आहेत. उपासना ते प्रगट करीत असून कुवासनांचे गोपन करीत आहेत." (कवितावली, उत्तरकांड छंद ७९, ८१, ८३, ८४, ८५, ९६, ९७, ९८, ९९, ११९) 'श्रीरामचरितमानस' या ग्रंथातही उत्तरकांड दोहा ९७, चौपाई ८ ते दोहा १०२ अखेरपर्यंत कलियुगाचे जे सविस्तर वर्णन केले आहे त्यात वास्तविक तत्कालीन परिस्थितीचे प्रतिबिंबच पडलेले आहे. सर्वच वर्णन मुळांतून पहाण्यासारखे आहे.

## सांस्कृतिक सूर्याचा उदय

याप्रमाणे सामाजिक, धार्मिक व्यवस्था बिघडून लोकांचा नैतिक अध:पात होऊं लागला. धर्मांतराची सक्ती, धर्मग्रंथांची होळी, शिखासूत्रे तोडणे, स्त्रियांची विटंबना, संपत्तीची लूटालूट, कत्तली हे रोजचेच झाले. धर्म धन, प्रतिष्ठा यांची शाश्वती उरली नाही. बौद्धिक शक्तीचा ऱ्हास होऊन अधिकांश जनता महत्त्वाकांक्षाहीन, निर्धन, जीवनासंबंधी उदासीन बनली. लोक भुकेने तडफडून मरत. अनेक परिवार नष्ट झाले. त्यातच सूफींना राजाश्रय असल्याने त्यांचा धर्मप्रसार जोरात सुरू होता. अकबर स्वत:ही धर्मप्रवर्तक बनला होता. हिंदू आचारविचारांचा तिरस्कार आणि मूर्तिविरोध बळावून एकेश्वरवाद प्रस्थापित होऊं लागला. परिणामी हिंदूधर्माचे वास्तविक स्वरूप काय यासंबंधी लोकांत संभ्रम उत्पन्न होऊन त्याचे भवितव्यच धोक्यात आले होते! अशा या कठीण काळांत तुलसीदास अवतरले आणि त्या अंधाऱ्या रात्री, जनसामान्यांना आशेच्या किरणांचा लाभ होऊन आपापली हरवलेली वाट सापडली, कर्तव्याची जाणीव झाली, जीवनाचे उद्दिष्ट गवसले आणि त्यामुळेच त्या तमोयुगांतून हिंदूधर्म तावून सुलाखून निघाला आणि त्याचे उज्ज्वल स्वरूप फिरून एकदा प्रकट झाले. म्हणूनच महाकवी निराला यांनी गोस्वामीसंबंधी काढलेले "भारतके नभका प्रभापूर्य। शीतलच्छाय सांस्कृतिक सूर्य" हे उद्‌गार सार्थ ठरतात!



॥२॥

# लौकिक जीवनाची रूपरेषा

आद्यकवेरवतारं भवतारक - रामचरित - विस्तारम्।

कामारिप्रियभक्तम् तुलसीदासं नमामि साष्टांगम् ॥

**(पू. प्रज्ञानानंद सरस्वती)**

एखादी व्यक्ती जन्मास येते तेव्हा ती अप्रसिद्धच असते. त्यामुळे जन्मस्थान, जन्मसंवत्, जन्मतिथी यांची नोंद व्यवस्थित ठेवली जातेच असे नाही. त्यांतही ती व्यक्ती बालपणीच पोरकी, अनाथ झाली तर मातृपितृहीन अशा त्या अबोध बालकाची दखल कोण घेणार? आणि जन्मतिथी वगैरे तरी कोण लक्षांत ठेवणार? पुढे तीच व्यक्ती आपल्या कर्तबगारीने उच्चपदास चढली, प्रसिद्धीस पावली की मग त्या व्यक्तीच्या संदर्भातील विविध उपक्रम, घटना यांची आपोआप नोंद ठेवली जाते. आणि मग त्या व्यक्तीच्या निधनकालाबद्दल, स्थलाबद्दल सहसा वाद उत्पन्न होत नाहीत. गोस्वामी तुलसीदासांच्या बाबतीतही त्यांनी गृहत्याग करून वैराग्य धारण केले, व त्यांना हनुमद्दर्शन, श्रीरामसाक्षात्कार घडल्यानंतरच्या चरित्रासंबंधी विद्वानात फारसे मतभेद नाहीत; कारण जसजशी त्यांची प्रसिद्धी झाली तसतसे त्यांच्या आयुष्यांत खाजगी असे काही राहिलेच नाही! प्रश्न आहे तो तत्पूर्वीच्या हकिगतीचा!

'मूल गोसाई चरित' हे त्यांतील उल्लेखानुसार जरी विक्रम सं.१६८७ मध्ये लिहिले गेले होते असे मानले, तरी ते ई. सन. १९२५ मध्ये प्रथम प्रकाशांत आले. त्याआधी तुलसीदासांच्या चरित्रासंबंधी जे उल्लेख मिळतात त्यावरून विदेशी विद्वानांचे असे अनुसंधान होते की गोस्वामींचा 'तारी' शी घनिष्ठ संबंध होता. 'तारी' नामक स्थान अन्तर्वेदीत होते. त्यांचे शिक्षण 'सोरो' (सूकरक्षेत्र) येथे झाले होते. आणि हे सूकरक्षेत्र म्हणजे एटा जिल्ह्यांतील कासगंज तहसील मधील सूकरक्षेत्र होय. त्यांचे गुरु नृसिंह होते. तसेच जनश्रुतीप्रमाणे -

'दुबे आत्माराम है पिता नाम जग जान ।

माता हुलसी कहत सब तुलसीके सुन कान ।

प्रल्हाद उदारण नाम करि गुरु को सुनिये साधु ।

प्रगट नाम नहिं कहत जग कहे होत अपराधु ।

दीनबंधु पाठक कहत ससुर नाम सब कोइ ।

रत्नावलि तिय नाम है सुत तारक गत होई ।

**(Notes on Tulsidas डॉ. ग्रियर्सन)**

पित्याचे नांव आत्माराम, मातेचे नांव हुलसी, गुरुचे 'नृसिंह' किंवा 'नरहरी', सासऱ्याचे नांव दीनबंधु पाठक, पत्नीचे नांव रत्नावलि, आणि पुत्राचे नांव 'तारापति' किंवा 'तारक' होते आणि तो बालपणीच मृत झाला होता. वरील तपशिलाबाबत बहुतेक विद्वानांचे एकमत आहे. मतभेद आहेत ते जन्मसंवत्, जन्मतिथी, जन्मस्थान, कुलगोत्र, गुरुपरंपरा वगैरे संबंधी!

## जन्म संवत

तुलसीदासांच्या जन्मसंवताबाबत निरनिराळे सहा उल्लेख आहेत. 'मूलगोसाई चरित' चे वेणीमाधवदासजी, व 'मानस' चे लेखक संशोधक पाठकजी यांच्या उल्लेखावरून विक्रम सं. १५५१ हा जन्मसंवत् मानण्यात येतो. अनेक भाविक लोक हाच जन्मसंवत् मानतात व श्रावण शुक्ल सप्तमी ही जन्मतिथी मानतात. पण या दिवशी 'अभिजित्' नक्षत्र असल्याचे जे वर्णन वेणीमाधवदासजींनी केले आहे ते ज्योतिषशास्त्रदृष्ट्या चुकीचे ठरते. तसेच याप्रमाणे गोस्वामीचे आयुष्य १२३ वर्षाचे ठरते आणि वि.सं. १६३१ मध्ये 'श्रीरामचरितमानसा' च्या रचनाकाळी ते ७७ वर्षाचे होते असे ही ठरते. म्हणून बऱ्याच विद्वानांना ही तिथी मान्य नाही. स्व. जगन्मोहन वर्मा हे 'राममुक्तावली' तील "पवन तनय मो सन कह्यो पाँच बीस अरूबीस।" या ओळीवरून गोस्वामींचे आयुष्य १२० वर्षांचे ते असे मानून जन्मसंवत् वि. १५६० मानतात. (५ X २०+ २० = १२० वर्षे) पण कुणी (५+२०+२०=४५ वर्षे) असाही अर्थ काढतात. श्री. शिवसिंह सेंगर यांनी वि.सं. १५८३ हा जन्मसंवत् मानला आहे. पण त्यास त्यांच्या म्हणण्याप्रमाणे 'गोसाई चरित्र' मध्ये आधार मिळत नाही. 'घट रामायण' कर्ता तुलसीसाहब यांनी आपल्या पूर्वजन्माची जन्मतिथी म्हणून भाद्रपद शुद्ध एकादशी, विक्रम सं. १५८९ चा उल्लेख केला असून, ज्योतिषगणनेनुसार ही तिथी ग्राह्य धरली आहे. पण तुलसीसाहब आपणच पूर्वजन्मी तुलसीदास होतो असे म्हणतात, तो त्यांचा दावा मात्र कुणालाच मान्य नाही. "गौतमचंद्रिका' या ग्रंथानुसार वि. सं. १६०० हा जन्मसंवत् मानला गेला असून विल्सन, ब्लूमहर्ट, तासी इत्यादींनी वि.सं. १६०० हाच ग्राह्य मानला आहे. मात्र ग्रियर्सन आणि बरेच आधुनिक विद्वान् वि.सं. १५८९ हाच ग्राह्य मानतात.

जन्मसंवता संबंधी सहावा उल्लेख अविनाशरायकृत 'तुलसीप्रकाश' मध्ये असून, त्याप्रमाणे तुलसीदासांचा जन्म श्रावण शुक्ल सप्तमी शुक्रवार, शक संवत् १४३३, विक्रम सं. १५६८, (१ ऑगस्ट १५११ ई. स.) या दिवशी विशाखा नक्षत्राच्या द्वितीय चरणावर झाला. 'तुलसी प्रकाश' हा ग्रंथ शंभर टक्के विश्वसनीय नाही. परंतु डॉ. रामदत्त भारद्वाज यांनी उटकमंडच्या सरकारी एपिग्रॅफिस्टकडून या दिवशीची ग्रहस्थिती विचारून घेतली, त्यावरून ही तिथी योग्य ठरते. या आधारावर तीन जन्मकुंडली संभाव्य होत्या. त्यांतील तिसरी तुलसीदासांच्या जीवनांतील घटनांचे समर्थन करते. तिच्यांत नीचीचा मंगळ असून त्याने गोस्वामींच्या माता, पिता, आणि पुत्राचे अपहरण केले. पंचमस्थानी गुरु आणि अकराव्या स्थानी शुक्र, विद्या आणि काव्यशक्ती प्रदान करतात आणि शुक्र दीर्घायुष्य देतो. हाच जन्मसंवत् असेल तर तुलसीदासांची निम्नलिखित पंक्ति त्यांच्या जीवनासंबंधी सार्थ ठरते. शिवाय 'श्रावण शुक्ला सप्तमी'च जन्मतिथी असल्याची आख्यायिका आहेच.

"जगते रहु छत्तीस है, रामचरन छहतीन।

तुलसी देखु बिचारी हिय है यह मतौ प्रवीन॥"

(सं. १६०४ गृहत्याग केला त्यावेळी ३६ वय, आणि 'मानस' रचना सं. १६३१ त्यावेळी ६३ वय).

## जन्मस्थानाचा वाद

जन्मसंवत् आणि तिथी याप्रमाणे जन्मस्थानाविषयीही विद्वानांत मतभेद आहेत. सोरो सामुग्री ज्ञात होण्यापूर्वी गोस्वामींची जन्मभूमी म्हणून चार स्थळांचा विचार केला जाई. हस्तिनापूर, चित्रकूट जवळील हाजीपूर, यमुनाकाठचे राजापूर आणि अंतर्वेदींतील तारी. हस्तिनापूर आणि हाजीपूर या संबंधी विशेष पुरावा उपलब्ध न झाल्याने ती नावे मागे पडली. 'तारी' ही गोस्वामींची जन्मभूमी नसून त्यांच्या मातेची 'हुलसी'ची जन्मभूमी असावी; व तेथे गोस्वामींची 'गर्भस्थिती' झाली असावी असे अनुमान करण्यास बराच वाव आहे. हल्ली कुणी 'अयोध्या' तर कुणी 'काशी' जन्मभूमी असल्याचा दावा करीत आहेत; पण तो पटण्यासारखा नाही. 'मूल गोसाई चरित' प्रमाणे यमुनाकांठी बांदा जिल्ह्यांतील 'राजापूर' हे जन्मस्थान मानले जाई. "पंद्रह से चौबन बिसै कालिंदी के तीर। सावन सुल्का सत्तिमी, तुलसी धरेउ सरीर" असे म्हटले आहे. तसेच हिंदीतील मोठमोठे रथी, महारथी श्री. मिश्रबंधु, पं.रामचंद्र शुल्क, बाबू श्यामसुंदरदास वगैरेंनी 'राजा पूर'च जन्मस्थान मानले आहे. पण श्री. रामचंद्र द्विवेदी, डॉ. माताप्रसाद गुप्त, डॉ. रामदत्त भारद्वाज यांच्या मते उपलब्ध पुराव्यावरून राजापूर हे तुलसीदासांचे कांही दिवस निवासस्थान असले तरी ते जन्मस्थान नाही आता बऱ्याच विद्वानांचे मतही असेच बनले आहे. दंतकथा आणि गॅझेटियर्स प्रमाणे राजापूर हे तुलसीदासांनी वसविले. येथे ते विरक्त झाल्यावर कुटी करून राहात असत; त्याअर्थी ते जन्मस्थान नाही. राजापुरांत तुलसीदासांनी लिहिलेल्या 'श्रीरामचरित मानसा'च्या अयोध्याकांडाची प्राचीन प्रत, तसेच त्यांनी स्थापन केलेली संकटमोचन नामक हनुमंताची मूर्ती विद्यमान आहे. एक कच्चे घर होते, ज्यास तुलसीदासांचे घर मानले जात असे, आता तेथे पक्के घर बांधले असून तेथेच यमुनेच्या वाळूत सापडलेली काळ्या पाषाणाची एक प्रतिमा दोन फूट उंचीची ठेवलेली आहे. कांही लोक ती तुलसीदासांची समजतात, तर काहींच्या मते ती राजा नावाच्या साधूची असून त्याच्या नावावरूनच तुलसीदासांनी 'राजापूर' असे नाव गावास दिले. श्री. चंद्रबली पांडे, ही प्रतिमा भक्तराज छीतूदास याची समजतात. तेथे गोस्वामींचे शिष्य गणपति उपाध्याय यांचे वंशज अद्याप आहेत आणि त्यांच्याकडे काही प्राचीन सनदा असून, त्यावरून त्यांना करवसुलीचे काही खास अधिकार मिळाले होते असे कळते. पण या सर्व गोष्टीवरून 'राजापूर' ही जन्मभूमी ठरत नाही.

डॉ. किशोरीलाल गुप्त, तसेच श्री. अंजीनीनंदन शरणजी वगैरे 'मानसपीयूष' मधील कांही टीकाकार यांच्या मते तुलसीदासांचा जन्म अयोध्येजवळील शरयु - घाघरा संगमाजवळील पसाक क्षेत्राजवळील राजापूर गावी झाला, व तेथील 'सूकरखेत' येथे त्यांनी गुरुकडून रामकथा श्रवण केली.

चिकित्सक दृष्टीने पाहिले असता 'सोरो' क्षेत्रांतर्गत 'रामपूर' हे जन्मस्थान असावे असे वाटू लागते. डॉ. रामदत्त भारद्वाज यांनी याबाबत भरपूर संशोधन केले असून अंत:साक्ष्य आणि बहि:साक्ष्य दोन्ही दृष्ट्या त्यांचे पुरावे पटण्यासारखे आहेत. तुलसीदासांनी विनयपत्रिकेत आपले जन्मस्थान भागिरथी गंगेच्या तीरावर असल्याचे सूचित केले आहे. (विनयपत्रिका पद १३५)

"दियो सुकुल जनम सरीर सुंदर हेतु जो फल चारि को

जो पाइ पंडित परम पद पावत पुरारि मुरारी को

यह भरत खण्ड समीप सुरसरि थल भलो संगति भली

तेरी कुमति कायर कलप वल्ली चहति विष फल फली ॥'

तसेच गृहत्याग करून गंगातट सोडून अनेक गिरीकाननात फिरूनही शांती मिळाली नाही असा उल्लेख मिळतो.

तृषावंत सुरसरि विहाय सठ

फिरि फिरि विकल अकास निचोयो॥ (विनयपत्रिका २४५)

कदाचित याच कारणाने त्यानी विरक्त झाल्यावरही कायमच्या वास्तव्यासाठी गंगातटस्थ काशीच पसंत केली असावी. तसेच पद (१४७ कवितावली उत्तरकांड) यातही 'बरु बारहि बार शरीर धरौ, रघुवीर कौहै तव तीर रहोगो। भागीरथी विनवौ कर जोरि, बहोरि न खोरि लगे सो कहौंगे' अशी वारंवार शरीर धारण करून गंगातीरी राहण्याची व रघुवीराचा दास होण्याची इच्छा तुलसीदासांनी व्यक्त केली आहे. तसेच कवितावली उत्तरकांड १२२ या 'तुलसी तिहोरा घर जायो है घर को' यावरून रामपूर सूचित होते. पदात 'तुलसी रामनाम सम मित्र आन । जो पहुँचाव रामपुर तन अवसान 'बरवै रामायण' ६७ यातील 'रामपूर' म्हणजे अयोध्या नसून 'रामपूर' हे जन्मग्राम असावे असे डॉ. रामदत्त भारद्वाज यांनी दाखवून दिले आहे. तसेच महाकवी नंददास यांचे पुत्र कृष्णदास आणि कवी मुरलीधर चतुर्वेदी यांनी त्यांच्या ग्रंथात तुलसीचे जन्मस्थान सोरो जवळील रामपूर असल्याचा उल्लेख केला आहे. तसेच तुलसी साहित्याकडे नजर टाकली तर त्यांचे गंगानदी विषयींचे प्रेम जसे पुन:पुन्हा व्यक्त झाले आहे तसे यमुना किंवा शरयु - घाघरा यांच्यासंबंधी झालेले दिसत नाही. बालपणात ज्या गोष्टींचा सहवास घडतो; त्याचा एक वैशिढ्यपूर्ण संस्कार मनावर होत असतो. या दृष्टीने त्यांच्या साहित्यांतील ओसंडून जाणारे गंगाप्रेम पाहिले की बालपणी ते गंगेच्या पाण्यातच मनसोक्त डुंबले असावेत असे खात्रीपूर्वक वाटते. त्यामुळेच इतर स्थानांपेक्षा 'रामपूर' जे गंगातीरी आहे व होते, तेच त्यांचे जन्मस्थान असावे असे वाटते. अर्थात या गोष्टीला कितीसे महत्व द्यावयाचे हा ही एक प्रश्नच आहे.

## वंश परिचय

'मूल गोसाई चरित' प्रमाणे गोस्वामी हे शरयू पारीण ब्राह्मण, पराशर गोत्री असून पतौजाचे दुबे आडनावाचे होते. विल्सन, ग्रियर्सन आदि त्यांना शरयु पारीण समजतात.

अनेक भारतीय विद्वानांचेही मत असेच आहे. पण 'दो सौ बावन वैष्णवन की वार्ता' यात वार्त्ता २५१ ही महाकवी नंददास यांची असून, त्यांत शीर्षकांतच नंददासांना सनाढ्य ब्राह्मण म्हटले असून ते तुलसीदासांचे बंधू सनौढिया ब्राह्मण होते असा उल्लेख आहे. 'सो वे तुलसीदास जी के भाई सनोढिया ब्राह्मण हते। सो तुलसीदासजी तो बढे भाई और छोटे भाई नंददासजी हते।'

'दो सौ बावन वैष्णवन की वार्ता' या ग्रंथाच्या प्रामाणिकतेबद्दल सर्व विद्वानांचे एकमत आहे. पण अनेकांनी 'भाई' म्हणजे 'गुरूभाई' गुरूबंधु होते असा अर्थ काढला आहे. नंददास आणि तुलसीदास यांचा एकत्र सहवास दीर्घकाळ झाला असावा व एकमेकांचे परस्परावर अत्यंत प्रेम असावे असे अनुमान करण्यास बराच वाव आहे. कृष्णदासकृत वंशावली वरून ते चुलत बंधू होते. 'वार्तात' तसा उल्लेख नाही. पण पूर्वी एकत्र-कुटुंबपद्धतीत चुलत भावंडात जे प्रेम नांदे त्याची कल्पना ज्याना असेल त्यांच्या मनात असा उल्लेख कसा नाही याबद्दल शंका येणार नाही. राम, लक्ष्मण, भरत शत्रुघ्न हे वास्तविक सापत्नबंधु पण एक कैकयी सोडून कुणाच्याही मनात कधी सापत्नभाव आला नाही व येतही नाही.

तुलसीदासांना कुणी सारस्वत, कुणी कान्यकुब्ज, कुणी शरयूपारीण तर कुणी सनाढ्य असे मानत असले तरी ते ब्राह्मण कुळांत जन्मले होते याबद्दल शंका घेण्याचे कारण नाही. कारण तसे स्पष्ट उल्लेख त्यांच्या साहित्यात मिळतात.

"भली भारतभूमि, भले कुलजन्म, समाज सरीर भलो लहिकै,

(कवितावली उत्तरकांड ३३/१)

"दियो सुकुल जनम सरीर सुंदर, हेतु जो फल चारिको"

(विनयपत्रिका १३५/३)

"जायो कुल मँगन, बधावनो बजायो सुनि, भयो परिताप पाप जननी जन को"

(कविता : उत्तर, ७३/१)

"भागिरथी जल पान करौ अस नाम है रामके लेत निते हो मोको न लेनी न देनी कछू कलि! भूलि न रावरी ओर चितै हौ जाति कै जोर करौ परिनाम, तुम्हे पछितैहौ पै मै न मितै हौ ब्राह्मण ज्यो उगिल्यौ उरगारि हौ, ज्या ही तिहारे हिए न हितैही ॥ " कवितावली उत्तरकांड पद १०२ यांत शेवटच्या ओळीत, "जसे गरूडाने ब्राह्मणास न पचल्यामुळे ओकून टाकले. तसा मी ही तुझ्या पोटात पचणार नाही" असे म्हटले आहे.

## भिन्न भिन्न मतप्रवाह

भविष्यपुराणात 'वाल्मिकीः तुलसीदासः' कलौ देवि भविष्यति' असा उल्लेख असून स्वामी शंकराचार्यांचे अनुयायी, मुकुंद ब्रह्मचारी बाबर बादशहाकडून भ्रष्ट केले गेले म्हणून २० शिष्यांसह त्यांनी स्वतःस अग्नीत जाळून घेतले. ते सर्व पुढील जन्मी संत झाले. त्यांपैकी श्रीधर नावाचा शिष्य अनूप शर्माच्या घरी उत्पन्न झाला. त्याचे नाव तुलसीदास ठेवले असे वर्णन मिळते. हा ग्रंथ अर्थातच अप्रामाणिक मानला जातो.

'तुलसीचरित' प्रमाणे तुलसीदासाचे प्रपितामह परशुराम मिश्र हे होते. त्यांचे पुत्र शंकर मिश्र. यांना दोन मुलगे, संतमिश्र आणि रूद्रनाथ मिश्र. रूद्रनाथ यांना चार पुत्र आणि दोन कन्या होत्या. पुत्रांची नावे गणपति, महेश, तुलाराम आणि मंगल आणि मुलींची नावे वाणी आणि विद्या. तुलाराम म्हणजे चरित्रनायक तुलसीदास. यांचे तीन विवाह झाले होते. तिसरी पत्नि कंचनपूर ग्रामनिवासी लक्ष्मण उपाध्याय यांची कन्या बुद्धिमती होती. 'तुलाराम'चे नाव कुलगुरूंनी 'तुलसीराम' केले व विरक्तीनंतर ते तुलसीदास नावाने प्रसिद्ध झाले. त्यांचे गुरू रामदास नावाचे होते. तसेच तुलसीराम काही उद्योगधंदा करीत नव्हते म्हणून मातापित्यांनी त्याना गृहकलहानंतर घराबाहेर वेगळे काढले. तसेच तृतीय विवाहाच्या वेळी गोस्वामींना ६००० हुंडा मिळाला होता इत्यादि अद्‌भूत असंभाव्य गोष्टी वर्णिल्या आहेत. ह्या विरुद्ध उल्लेख तुलसी साहित्यात असल्याने ह्या चरित्राची अप्रामाणिकता स्वयंसिद्धच आहे.

'मूलगोसाईचरित' मध्ये पित्याचे नाव दिलेले नाही. ते 'रजिया' पूर'चे राजगुरू असल्याचे सांगितले असून, मातेचे नाव 'हुलसी दिलेले आहे. त्यांचा जन्म पसाका जवळील राजापूर येथे झाला असे मानणाऱ्या विद्वानांच्या मते गोस्वामींचे पूर्वज बाँसडीह रियासत, भदौला देवरियाहून तेथे दुष्काळ पडल्याने राजापूरला पसाका संगमाजवळ येऊन राहिले होते, आणि तेथील राजपुरोहित झाले होते. घाघरा-शरयू संगमाजवळ वाराहीदेवी येथे तुलसीदासांचे पिता आत्माराम यांनी घोर तपस्या केली आणि त्यानंतर तुलसीदासांचा जन्म झाला. तुलसीदासांची माता श्रीहुलसी ही श्री. धनीर मिश्र यांची पुत्री आणि पंडित जगतनारायण मिश्र यांची पौत्री होती. तिचे जन्मस्थान दहडाताल (दांधवाल) जिल्हा बहराइच हे होते. तिला कमला आणि विमला अशा दोन मुली झाल्या पण त्या ७/८ वर्षाच्या होऊन गेल्या आणि नंतर गोस्वामी तुलसीदास जन्मले. (डॉ. किशोरीलाल गुप्त: गोसाई तुलसीदास: जीवनचरित, तुलसी ग्रंथावली खंड ३ रा पृष्ठ १५५-५६).

गोस्वामी तुलसीदासांनी आपल्या पित्याच्या नावाचा स्पष्ट उल्लेख कुठे केलेला नाही. मातेच्या नावाचा उल्लेख 'श्रीरामचरित मानस' बालकांडात 'रामही प्रिय पावनि तुलसी सी। तुलसिदास हित हिय हुलसी सी॥" या चौपाईत आला आहे. अर्थात रामकथा श्रीरामास पवित्र तुलसी समान पिय आहे. आणि हुलसीप्रमाणे तुलसीदासांचे अंतःकरणापासून हित (इच्छिणारी) करणारी आहे असे म्हटले आहे. अशी आख्यायिका आहे की एकदा एका गरीब ब्राह्मणास काही द्रव्य सहाय्य हवे होते; तेव्हा गोस्वामींनी पुढील ओळ लिहून त्यास खानखाना अब्दुलरहीमखाँ यांच्याकडे धाडला. 'सुरतिय, नरतिय, नागतिय, सब चाहति अस होय'. त्यापुढे खानसाहेबांनी पुढील ओळ लिहून दिली 'गोद लिये हुलसी फिरै तुलसी सो सुत होय' आणि त्या ब्राह्मणास द्रव्यसहाय्यही केले. यावरून तुलसीदासांच्या मातेचे नाव 'हुलसी' असावेसे वाटते.

सूकरक्षेत्रमाहात्म्य, कृष्णदासकृत वंशावली, मुरलीधर चतुर्वेदी-कृत रत्नावली चरित, रत्नावलीचे दोहे, तुलसीप्रकास इत्यादी ग्रंथावरून असे दिसून येते की तुलसीदासांचे पूर्वज (सोरों) सूकरक्षेत्राजवळील रामपूरचे रहिवासी होते. ते सनाढ्य शुक्ल ब्राह्मण होते. त्यांचे गोत्र भारद्वाज होते. त्यात नारायण शुक्ल यांना चार पुत्र, श्रीधर, शेषधर, सनक आणि

सनातन. सनातन यास परमानंद हा पुत्र व त्यास सच्चिदानंद हे झाले. त्यांचे दोन पुत्र होते, आत्माराम आणि जीवाराम. आत्माराम यांचे पुत्र तुलसीदास आणि जीवाराम यांचे दोन पुत्र होते, नंददास आणि चंद्रहास. वल्लभसंप्रदायातील महाकवी नंददास हे याप्रमाणे गोस्वामींचे चुलतबंधू ठरतात. 'तुलसीप्रकास' कर्ते अविनाशराय यांच्या म्हणण्याप्रमाणे गंगेच्या दक्षिण किनाऱ्यावर 'तारी' म्हणून एक गाव होते. तेथे अयोध्यानाथ दुबे नावाचे ज्योतिषी राहात होते. ते शांडिल्यगोत्री होते. त्यांचा एकही पुत्र जिवंत राहिला नाही. त्यांची पुत्री 'हुलसी' ही विवाहयोग्य झाल्यावर त्यांनी जवळच्या सूकर क्षेत्रातील रामपूरच्या आत्माराम सुकुल यांच्याबरोबर तिचा विधीपूर्वक विवाह करून दिला. विवाहानंतर काही वर्षांनी अयोध्यानाथ दुबे यांनी आपल्या जावयास बोलावून आपले सर्व काही त्याच्या स्वाधीन करून स्वर्गगमन केले. त्यावेळी 'तारी' येथे वर्षभर राहून पं.आत्माराम हुलसीसह आपल्या गावी रामपुरास येऊन राहिले. सासऱ्याची मालमत्ता त्यांना मिळाली, तसेच 'तारी' येथे वास्तव्य वर्षभर झाले आणि सासऱ्यांचे आडनाव 'दुबे होते. म्हणून कदाचित 'दुबे आत्माराम है पिता जग जान' अशी जनश्रुती निर्माण झाली असावी.



॥३॥

# बालपण आणि विद्याप्राप्ती

'रम्य ते बालपण असे म्हटले जाते पण ते भाग्य तुलसीदासांच्या वाट्याला आले नाही. त्यांच्या साहित्यावरून त्यांचे बालपण अत्यंत खडतर गेले असे दिसते. 'मूल गोसाई चरित' प्रमाणे ते मातृ-गर्भात बारा महिने होते. अभुक्त मूळ नक्षत्रावर त्यांचा जन्म झाला. जन्मल्याबरोबर त्यांनी 'राम' नावाचा उच्चार केला. त्यांना जन्मतःच बत्तीस दास होते वगैरे वर्णन असून त्यांच्या मातेने 'चुनिआ' दासीला आपले अलंकार देऊन त्या अर्भकास घेऊन तेथून निघून जाण्यास सांगितले. कारण आपला पती व इतर कुटुंबीय, त्याच्या अशुभ लक्षणामुळे त्याचा कदाचित् त्याग करतील अशी भीती तिला वाटली. चुनिआ त्याप्रमाणे निघून गेल्यावर प्रातःकाळी मातेचे प्राणोत्क्रमण झाले. पण तुलसीदासांच्या स्वतःच्या साहित्यात याचा उल्लेख नाही. त्यांनी मातापित्यानी आपला जन्मताच त्याग केल्याचा उल्लेख सर्वत्र केला असला तरी सर्वत्र 'मातापिता' 'जननीजनक' असा दोघांचा एकत्र उल्लेख आला आहे. तसेच आईवडिलांनी त्याग केला म्हणजे ते स्वर्गवासी झाले असाच अर्थ घ्यावा असेच बऱ्याच विद्वानांचे मत आहे. विनयपत्रिकेत पद १७१ मध्ये 'गर्भ-वास दस मास पालि पितु-मातु रूप हित कीन्हों॥ ' असा उल्लेख आहे. त्यावरून तुलसीदास मातेच्या गर्भात दहा महिने होते व (डॉ. रामदत्त भारद्वाज म्हणतात त्याप्रमाणे) 'दसमास' देहली दिपक न्यायाने घेतल्यास नंतर दहा महिने माता-पिता जिवंत होते असे दिसते. या पदात 'गर्भवासात दहा महिने आणि नंतरचे दहा महिने पालनपोषण तुम्ही मातापिता यांच्या रूपाने माझे हित केले, असे रामप्रभूंना म्हटले आहे. अर्थात् नंतर त्यांचा स्वर्गवास झाल्याने ते दहा महिन्याचे बालक अनाथ झाले आणि त्याच्या कष्टास पारावार राहिला नाही.

'तुलसीप्रकाश' प्रमाणे त्याच्या वडिलांना पोटाची व्यथा होती व आई 'हैजा' ने स्वर्गवासी झाल्यावर थोड्याच दिवसात तेही ज्वराने स्वर्गवासी झाले. घरात केवळ त्यांची वृद्ध आजी (पितामही) होती. पण निर्वाहाचे साधन काहीच नसल्याने त्यांना अत्यंत लहानपणीच भिक्षावृत्ती स्वीकारावी लागली. असे म्हणतात की, त्यांच्या मातेने 'तुलसी'ची आराधना केल्याने त्यांचे नांव 'तुलसी' असे ठेवले होते. कदाचित् जन्मतः रामनाम उच्चारण्याने म्हणा किंवा 'रामनाम' उच्चारून भिक्षा मागत असत म्हणून असेल, पण त्यांचे नाव 'रामबोला' असेही पडले होते. विरक्त झाल्यानंतर 'तुलसी'चे 'तुलसीदास' पडले.

१) "रामको गुलाम, नाम रामबोला, राख्यो राम, काम यहै नाम द्वै हौं कबहुं कहत हो।"

२) "साहिब सुजान जिन स्वान हू को पक्ष कियो, रामबोला नाम हौं, गुलाम राम साहि को। (कवितावली उत्तरकांड ९४)

३) "नाम तुलसी, पै भोंडे भाग सों कहायो दास, किये अंगीकार ऐसे बडे दगाबाजको (कवितावली उत्तरकांड १३)

४) "नाम रामको कलपतरू, कलि कल्यान निवास जो सुमिरत भे भाँग ते, तुलसी तुलसीदास (दोहावली ११)

जन्मतःच मातापित्याने त्याग केल्याचा उल्लेख त्यांनी अनेक वेळा केला आहे. वैराग्य प्राप्त होऊन श्रीरामप्रभूंची कृपा झाल्यावरही या गोष्टीची खंत त्यांना सदैव वाटत राहिली असावी. कारण वृद्धावस्थेत लिहिलेल्या विनयपत्रिका, कवितावली हनुमानबाहुक इत्यादि ग्रंथांतही त्यांनी अनेकवेळा या गोष्टीचा उल्लेख केला आहे. अनाथ, परित्यक्त झाल्याने त्यांना अन्नासाठी दारोदार भटकावे लागले, लोकांची निर्भत्सना ऐकावी लागली, अपमान सोसावा लागला. त्या स्थितीचे अनेक ठिकाणी त्यांनी मार्मिक शब्दांत वर्णन केले आहे. बाळपणातील या दुरवस्थेबद्दल ते दोष मात्र कुणालाच देत नाहीत. 'माझेच अभाग्य' असे म्हणतात.

"मातु पिता जग जाय तज्यो, विधि हू न लिखी कछु भाल भलाई । नीच निरादर भाजन कादर, कूकुर टूकन लागि ललाई।" (कवितावली उत्तरकांड ५७)

"जातिके, सुजातिके, कुजातिके, पेटागि बस। खाए टूक सबके बिदित बात दुनी सो॥ (कविता उत्तरकांड ७२)

कवितावली उत्तरकांड ७३ मध्ये

"जायो कुल मंगन, बधावनो बजायो सुनि,

भयो परिताप पाप जननी-जनक को।

बारे ते ललात बिललात द्वार द्वार दीन,

जानत हो चारि फल चारि ही जनक को॥'

यावरून कुणी असा अर्थ काढतात की ते निर्धन कुळात उत्पन्न झाले त्यामुळे त्यांच्या जन्माने मातापित्यांना हर्ष होण्याऐवजी दुःख झाले, तर कुणी म्हणतात अशुभ लक्षणांनी युक्त

असल्याने मातापित्यांना पश्चाताप, पाप (कष्ट) झाले. तर कांहीनी 'परिताप पाप' इत्यादि शब्दांवरून सुताने स्वर्ग गाठून तुलसीदास हे पापकर्माचे संतान होते असा अर्थ काढला आहे. पण ह्याच तुलसीदासांनी "दियो सुकुल जन्म, सरीर सुंदर, हेतु जो फल चारि को' (विनयपत्रिका १३५) 'भली भारतभूमि, भले कुल जन्मु, समाजु सरीरू भलो लहि कै' (कविता उत्तर. ३३) असे स्पष्ट म्हटले असल्याने वरील सर्व अनुमाने खोटी ठरतात. 'तुलसी प्रकाश' मध्ये तुलसीदासांच्या जन्मानंतर लगेच तीन दिवस आत्माराम यांच्या 'उदर आत्माराम के डब्यो सूल अति घोर', असे वर्णन केले आहे. त्यामुळेच आपला पती मूर्छीत, मरणासन्न पाहून हुलसी व तिची सासू तसेच दीर जीवाराम यांना कष्ट झाल्याचे वर्णन कदाचित सार्थ असेल.

## निराश्रित जीवन

कवितावली उत्तरकांड १४८ मध्ये, ते म्हणतात 'देवी अन्नपूर्णेस जोपर्यंत दया येत नाही तोपर्यंत मनुष्य तुकड्या तुकड्यासाठी लाचार होऊन दीन आणि मलीन असा दारोदार तोंड वेगाडत हिंडत असतो, आणि तरी त्याच्या मनातील चिंता कांही नष्ट होत नाही. कोठे श्राद्ध, वा विवाह किंवा उत्सव नाहीना याचा तो सदैव शोध घेत राहतो. द्विधा मनोवृत्तींत इकडेतिकडे हिंडत असता कुठे ढोल वा तुतारीचा शब्द ऐकू येतो आहे का इकडे त्याचे लक्ष लागलेले असते आणि तेथे काही उत्सव वगैरे तर नाही ना याची तो चौकशी करीत असतो. तहान लागली तरी त्यास पाणी मिळत नाही. भूक लागली तर चार चणे मिळत नाहीत. पर्वतप्राय भोजनाची इच्छा तर होते पण धूरेवर पडलेली डाळही लाभत नाही. याप्रमाणे तो शोकनिधान आणि दुःखाच्या भाराने दबलेलाच राहतो.'

विनयपत्रिका पद २७५ मध्ये ते सांगतात की निराश्रित होऊन भाकरीच्या तुकड्यासाठी ते दारोदार कुत्र्याप्रमाणे भटकत होते. आणि अपमान सहन करीत होते. चार दाणे पदरात पडावे म्हणून ते हातापाया पडत, गयावया करीत आणि शेवटी निराश होत. जन्मताच कुटिल कीटांप्रमाणे आईवडील त्यांना सोडून गेले! ते कुणावर रागवतही नाहीत वा कुणाला दोषही देत नाहीत; कारण त्यांचे भाग्यच त्यांच्यावर रूसले होते. त्यांच्या सावलीला स्पर्श करण्यासही कुणी धजावत नव्हते. त्यांना दुःखित पाहून संतांनी दिलासा दिला की, अरे, मनात दुःख करू नको; तुझ्यासारखे पातकी, पामर, पशु इत्यादी जर शरण आले तर रघुवीर त्यांचा त्याग करीत नाहीत. तेव्हा प्रेम-प्रतीति नसताच तुलसी रामाचा झाला आणि परिणामस्वरूप प्रतिष्ठा आणि सुख यांचा लाभ त्यास झाला.

मानसांतील 'सप्तप्रश्न' मध्ये जगातील सर्वांत महान दुःख कोणते याचे उत्तर देताना काकभुशुंडीनी 'नहि दरिद्रसम दुःख जगमाही।' असे उत्तर दिल्याचे वर्णन आहे. यावरून गोस्वामी तुलसीदासांचा स्वानुभवच त्यांतून व्यक्त झाला असावा असे मनात आल्याखेरीज राहात नाही.

एकनाथ महाराज तुलसीदासांचे समकालीन. त्यांचाही जन्म अभुक्त मूळ नक्षत्रावर झाला आणि आईवडिल बालपणीच स्वर्गवासी झाले. त्यावर त्यांनी 'मूळीच्या मुळी एका

जन्मला। मायबापे थोर धाक घेतला' वगैरे उद्‌गार काढले आहेत. त्यांचे पालनपोषण त्यांच्या आजाआजीनेच केले. पण तुलसीदासांना दारिद्र्याचे चटके बसून, बालपणी जसे खडतर आयुष्य जगावे लागले, तशी पाळी नाथांवर आली नाही. विनयपत्रिका २७२ मध्ये तुलसीदास म्हणतात की, 'अगुन अलायक आलसी जानि अधम अनेरो। स्वारथ के साथिन्ह तज्यो तिजराको सो टोटक औचट उलटि न हेरो ॥ स्वार्थी लोकांनी एकादा उतारा टाकलेला असावा त्याप्रमाणे त्यांचा त्याग केला आणि नंतर चुकून वळूनसुद्धा पाहिले नाही! याप्रमाणे ज्या जन्मग्रामी त्यांना असे हाल सोसावे लागले; ते त्यांचे जन्मग्राम म्हणजे आपलेच विशिष्ट गांव असे सिद्ध करण्यासाठी आता मात्र निरनिराळ्या गावातील लोकांत चढाओढ चालू आहे!

## गुरुप्राप्ती आणि विद्याप्राप्ति

गोस्वामी तुलसीदासांनी आपल्या गुरूंच्या नावाचा स्पष्ट उल्लेख केलेला नाही. 'श्रीरामचरित मानसात' त्यांनी 'बन्दउ गुरुपदकंज, कृपासिंधु नररूप हरि। महामोह तमपुंज, जासु बचन रविकर निकर।' (बालकांड ५) असा संकेत मात्र केला आहे. यावरून 'नरहरी' नाव असावे असे सर्वच मानतात. मात्र हे नरहरी कोण याचा उलगडा नीटसा होत नाही. मात्र गोस्वामींनी 'मै पुनि निजगुरसन सुनी, कथा सो सूकरखेत, समझी नहि तसि बालपन, तब अति रहेऊँ अचेत" (बालकांड ३० दोहा) असा उल्लेख केला आहे. यावरून रामकथा अगदी बालपणी गुरुमुखाने सूकरखेत येथे ऐकली असावी असे अनुमान करता येते.

श्रीउदयशंकर दुबे यांच्या मते 'मानसा'च्या जुन्या हस्तलिखित प्रतीत 'कथा रुचिर कुरूखेत', 'कथा सुरस कुरूखेत' असे विविध पाठ असले तरी 'कुरूखेत' हा शब्द सर्वच प्राचीन प्रतीत आढळतो. त्यावरून तुलसीदासांनी रामकथा गुरूकडून धर्मक्षेत्रीं कुरूक्षेत्री श्रीसूर्यग्रहणाच्या पर्वणी दिवशी ऐकली असेच सिद्ध होते. (तुलसीग्रंथावली, तृतीयखंड पृष्ठ २१३ ते २१७)

'मूलगोसाईचरित' वरून 'रामानंद' परंपरेतील कुणी नरहर्यानंद यांनी चुनिआ स्वर्गवासी झाल्यावर गोस्वामींना शंकराच्या आज्ञेवरून ताब्यात घेऊन त्यांचा सांभाळ केला. उपनयन करून राममंत्र दिला. आणि शरयू-घाघरा संगमाजवळील सूकरखेत येथे रामकथा सांगितली. असे म्हणतात की या स्थानी भगवान् वराह आणि वाराही देवीची दोन प्राचीन मंदिरे आहेत. तशीच मंदिराजवळच एक खूप प्राचीन कुटी असून येथे वड आणि पिंपळ यांचे जे प्राचीन वृक्ष आहेत, ते बाबा नरहरीदास (नरहर्यानंद) यांनी लावले होते. तसेच ती कुटी ही त्यांचीच असून त्यावेळचे तेथील राजे धौकतसिंह ह्यांनी त्यांना काही जमीन इनाम दिली होती. तीही अद्याप तेथील श्रीराम अवधदास बाबा (दहाव्या पिढीतील) यांच्या ताब्यांत आहे. तसेच वृत्तिदाता आणि भोक्ता यांच्या परंपराही अबाधित आहेत असे म्हणतात.

डॉ. रामदत्त भारद्वाज व इतर, 'सोरो' म्हणजेच 'सूकरखेत' असे मानणारे यांच्या मते 'सोरो' येथील चक्रतीर्थाजवळ श्री नृसिंह चौधरी यांच्याजवळच तुलसीदास आणि नंददास या दोघांचे शिक्षण झाले. श्री नरहरी हे स्मार्त वैष्णव असून श्रीराम आणि हनुमान यांचे भक्त होते. त्यांच्यापासूनच या दोघांना राममंत्र मिळाला. म्हणजे ते दोघे गुरुबंधूही होते.

"गुरु कह्यो रामभजन नीको मोहिं लागत राजऊगारो सो" (विनयपत्रिका १७३) असे तुलसीदासांनी म्हटले आहे. गुरुंनी अगदी रस्त्यातून उचलून आणून त्यांच्या जीवनास वळण लावले. त्यांच्या निरपेक्ष शिष्यवात्सल्याचा ठसा तुलसीदासांच्या अंतःकरणात खोलवर उमटलेला दिसतो. (श्रीरामचरित मानसांतील 'गुरूवंदन' पहावे) गुरुभक्त असूनही तुलसीदासांनी स्वतःची गुरूपरंपरा देऊ नये याबद्दल आश्चर्य वाटते. त्यांच्याच समकालीन एकनाथांनी मात्र 'एका जनार्दन' असे प्रत्येक ठिकाणी म्हणून आपल्या गुरूच्या नावाचा उद्घोष सर्वत्र केला आहे. नाभादास हेही रामानंद परंपरेतील समकालीन असता, गोस्वामी जर त्याच परंपरेतील असते तर नाभादासांनी तसा त्यांचा उल्लेख कसा केला नाही, अशीही शंका मनास चाटून जाते. मात्र "नरहरि कांचन कामिनी रहिये इनते दूरि। जौ चाहिय कल्याण निजु राम दरस भरपूर।' हा दोहा प्रसिद्ध असून यावरूनही गुरूचे नाव नरहरी असावे असे दिसते.

## श्रीगुरू नरहरी

एक दिवस 'सोरो' मध्ये गंगानदीच्या तीरावर एक वैश्य काही दान करीत होता. बाल तुलसीदास अधीर होऊन पहात होते; पण त्यांना काहीच मिळाले नाही. नृसिंहजी संयोगवश तेथे होते. त्यांनी उदास बालक पाहून चौकशी केली आणि आपल्या घरी नेले. नंतर त्यांनी सर्वतोपरि तुलसीदास आणि नंददास यांची काळजी घेतली असावी. (नंददासांचे पिताही, ते ३/४ वर्षांचे असता, व त्यांचे बंधु चंद्रहास अगदी लहान असता क्षयरोगाने स्वर्गवासी झाले होते) आणि त्यांना सर्वप्रकारे शिक्षण देऊन रामोपासनाही दिली असावी. अविनाशरायकृत 'तुलसी प्रकाश' प्रमाणे नंददास आणि तुलसीदास ह्यांनी गायन - वादनाचे शिक्षणही घेतले होते. त्यासाठी ते सीतारामजी मंदिरांतील हरिहरस्वामींच्याकडे जात असत आणि दोघेही संगीतशास्त्रात प्रवीण झाले. दोघांच्याही ग्रंथात ही संगीत- प्रवीणता दिसते. गुरूदेव हे हनुमानभक्त आणि रामभक्त होते. 'सोरो' मध्ये अद्यापही 'नृसिंह चौधरींची पाठशाला असून तेथे प्राचीन वटवृक्षाखाली हनुमंताची मूर्तीही आहे. त्याचप्रमाणे नृसिंह चौधरी हे गृहस्थाश्रमी होते, त्यामुळे त्यांचे व नंददासांचे वंशज अद्यापही 'सोरो' व 'रामपूर' येथे आहेत. तुलसीदास बालपणीच हनुमंताची भक्ती करू लागल्याचा उल्लेख 'हनुमान बाहुक' मध्ये आहे. पहा (२१, २९, ३४, ३८) तसेच गुरूप्रमाणे तुलसीदासही बालपणी, युवावस्थेत, प्रौढावस्थेत आणि वृद्धावस्थेतही स्मार्त वैष्णव असावेत असे त्यांच्या साहित्यावरून दिसून येते.

'मूलगोसाईचरित' प्रमाणे रामकथा नरहर्यानंद यांनी सांगितली पण इतर शिक्षण काशी येथील 'शेषसनातन' यांच्याकडून तुलसीदासांना मिळाले. पण ते जर विद्यागुरू असते तर त्यांचा उल्लेख तुलसीसाहित्यात कुठे ना कुठे तरी आल्याखेरीज राहिला नसता! सोरो सामग्रीप्रमाणे नृसिंह चौधरी यांच्याजवळच नंददास व तुलसीदास या दोघांचे सर्व शिक्षण पुरे होऊन व्याकरण, गणित, काव्यशास्त्र, नानापुराणे, दर्शने वगैरे शिकून ते महापंडित बनले.

# श्री गुरुपरंपरा

'श्रीरामचरित मासन' कसे प्राप्त झाले हे सांगताना मानसाची गुरूपरंपरा मात्र तुलसीदासांनी 'श्रीरामचरित मानस' बालकांड दोहा ३० मध्ये सविस्तर सांगितली आहे. प्रथम महेशांनी ही कथा रचून आपल्या मानसात ठेवली आणि त्यांनीच 'रामचरित मानस' हे नाव त्या कथेस दिले. 'रचि महेस निज मानस राखा। पाइ सुसमऊ सिवा सन भाषा॥' 'तातें रामचरितमानस वर धरेऊ नाम हियँ हेरि हरषि हर।' (दोहा ३५-११-१२ चौपाई) त्याची परंपरा सांगताना ते म्हणतात,

"संभु कीन्ह यह चरित सुहावा। बहुरि कृपा करि उमहि सुनावा॥"

"सोई सिव कागभुशुंडि हि दीन्हा। राम भगत अधिकारी चीन्हा ॥

ते हि सन जागबलिक पुनि पावा। तिन्ह पुनि भरद्वाज प्रति गावा॥

(बालकांड दोहा ३० चौपाई ३-४)

येथपर्यंत परंपरा सांगून हे सर्व श्रोते वक्ते समशील, सर्वदर्शी हरिलीलेचे रहस्य जाणणारे होते हे त्यांचे वैशिष्ट्य सांगितले. "औरऊ जे हरिभगत सुजाना। कहहिं सुनहिं समुझहिं बिधि नाना" असे म्हणून गरुडादि विहंग व इतर ज्यांनी कुणी वरील वक्त्यांकडून कथा ऐकली असेल, त्यांचा उल्लेख केला आहे. आणि हीच कथा 'कुरूक्षेत्र' म्हणा किंवा 'सुकरखेत' म्हणा, या ठिकाणी तुलसीदासांनी आपल्या गुरुकडून बालपणी, अचेत (अज्ञान) असतानाच ऐकली. त्यावेळी ती त्यांना तितकीशी समजली नाही. कारण ते 'कलिमलविमूढ' होते आणि रामकथा तर अति गूढ, ज्ञानी श्रोत्यास समजेल अशी होती. तरीपण गुरूंनी त्यांना ती वारंवार सांगितली, अर्थात् फोड करून रहस्य उकलून दाखविण्याचा प्रयत्न केला असणार, आणि ती तुलसीदासांना यथामती समजली. तीच पुढे त्यांनी (हिंदीत) भाषाबद्ध केली असे ते म्हणतात. (तेव्हा गुरूंनी सांगितली ती कदाचित् संस्कृतमध्येही असू शकेल.) त्यांच्या गुरूंना ती कोणाकडून मिळाली हे दिलेले नाही. पण 'मानसा' त जशी लोमशऋषीद्वारा शंकराकडूनच ती काग-भुशुंडीना प्राप्त झाली. तशी तुलसीदासांच्या गुरूंच्याद्वारे ती कथा त्यांना साक्षात् शंकराकडूनच प्राप्त झाली असावी. व अशारीतीने वास्तविक साक्षात् शिव हेच त्यांचे आदिगुरू ठरतात. म्हणूनच यांनी 'मानसात' 'वन्दे बोधमयं नित्यं गुरूं शंकररूपिणम्। यमाश्रितो हि वक्रोऽपि चन्द्रः सर्वत्र वंद्यते॥ ३॥' तसेच 'गुरु पितु मातु महेस भवानी। प्रनवऊ दीनबंधु दिन दानी ॥ बा. कां. दोहा १५ चौपाई ३ 'सुमिरि सिवा सिव पाई पसाऊ। बरनऊ राम चरित चित चाऊ॥ बा.कां. दोहा १५ चौपाई ८ असे उद्गार काढले आहेत. या सर्व गोष्टीवरून एकनाथ महाराजांची गुरुपरंपरा जशी 'नारायण विधि अत्रिनाथ। दत्त जनार्दन एकनाथ,' किंवा समर्थांची जशी 'नारायण विधि वसिष्ठ राम। रामदास कल्याणधाम।' अशी सांगण्यात येते व त्यावरून साक्षात् दत्तांनी जनार्दन स्वामीस, व त्यांच्याकडून एकनाथास अनुग्रह मिळाला व प्रत्यक्ष रामप्रभूंनीच समर्थांवर अनुग्रह केल्याचे दिसून येते. त्याप्रमाणे साक्षात् शंकर, त्यांच्याकडून नरहरी व त्यांच्याकडून तुलसीदासांना अनुग्रह मिळाला असावा असे अनुमान करता येते.



||४||

# गोस्वामींचे वैवाहिक जीवन

गोस्वामीनी आपल्या स्त्रीच्या नावाचा कुठेही उल्लेख केलेला नाही, किंवा विवाह झाला होता किंवा नाही यासंबंधीही स्पष्ट काही लिहिलेले नाही. फक्त 'हनुमान बाहुक' मध्ये एका स्थानी संकेत मिळतो की त्यांनी विवाह केला होता.

"बालपने सुधे मन राम सनमुख भयो, राम नाम लेत माँगि खात टूकटाक ही ॥ परयौ लोकरीतिमे, पुनीत प्रीति रामराय मोहबस बैठो तोरि तरकि तराक है। (४० बाहुक) तसेच (विनयपत्रिका ८३) मध्ये "लरिकाई बीती अचेत चित, चंचलता चौगुने चाय। जोबन - जुर जुबती कुपथ्य करि, भयो त्रिदोष भरि मदन बाय॥ मध्य बयस धन हेतु गंवाई, कृषी बनिज नाना उपाय। राम विमुख सुख लह्यो न सपने हुँ, निसिवासर तयो तिहू ताय॥ ८३ ॥ असे म्हटले आहे.

मूलगोसाई चरितप्रमाणे तुलसीदासांचे शास्त्राध्ययन काशीत झाल्यावर ते परत राजापूरला येऊन राहू लागले व तेथेच त्यांचा विवाह झाला. त्यात त्यांच्या पत्नीच्या नावाचा उल्लेख नाही. 'दोहा रत्नावली' तसेच 'रत्नावली चरित' वरून असे कळते की, सूकरखेत पासून जवळच गंगेच्या दुसऱ्या तीरावर बदरिया नावाच्या गावात दीनबंधु पाठक नावाचे वेदशास्त्रसंपन्न आणि सदाचारी विप्र राहात होते. ते ईश्वरभक्त असून उपाध्याय वृत्ती करीत असत. त्यांची पत्नी दयावती ही मोठी पतिव्रता, शीलवती, गुणवती होती. त्यांना तीन पुत्र शिव, शंकर, आणि शंभु असे झाले. त्यानंतर रत्नावली नावाची कन्या झाली. तिचे रूप अत्यंत मनोहर होते, व ती सदाचरणी होती. ती मातापित्यांची, कुटुंबाची लाडकी असून मधुर भाषी, आणि सुख, शांति, शील आणि स्नेहाची मूर्तीच होती. आकर्षक व्यक्तिमत्त्व असून शिवाय ती गूढ ज्ञानाची चर्चाही करी. तिच्या छोट्या मुखातून मोठ्या गोष्टी फार मधुर लागत. ती लहानपणीच गृहकृत्यदक्ष झाली होती. भावांबरोबर तीही लिहू वाचू लागलेली पाहून तिलाही वडिलांनी व्याकरण, कोष, छंदशास्त्र वगैरे शिकवले. ती वाल्मीकि रामायण तर वाचीत असेच शिवाय काव्योत्पत्तीही करीत असे. शिवपार्वतीचे नित्य ध्यान पूजन ती मोठ्या प्रेमाने करी.

ती विवाहयोग्य होताच वरसंशोधनार्थ, पित्याचे प्रयत्न चालू झाले. एका स्नेह्याच्या सल्ल्यावरून ते श्री. नृसिंह चौधरी यांच्याकडे 'सोरो' येथे आले. त्यांची पाठशाळा सूकरखेतला चक्रातीर्थाजवळ होती व तेथे अनेक मुले शिकत होती. त्यांतच रामपूर-निवासी सनाढ्य कुळाचे भूषण असे गुणवान तुलसीदास नंददास, शिकून तयार झाले होते. त्यातील तुलसीदास हे गौरवर्णाचे विद्याशास्त्रनिपुण महान् पंडित, चतुर आणि दुर्गुणरहित असे जाणून व रत्नावलीस हा सुशील, सुदृढ, निरोगी असा वर योग्य आहे हे जाणून व गोत्रकुल इत्यादीची माहिती गुरुजींच्याकडून करून घेऊन, रीतसर सर्व व्यवहार पाळून त्यांनी विधिवत् रत्नावलीचा हात तुलसीदासांच्या हाती दिला.

रत्नावली सारखी स्त्री प्राप्त झाल्याने तुलसीदासांना अत्यंत सुख झाले. रत्नावलीच्या सेवेचे सुख भोगून त्यांची पितामही काही दिवसांनी दिवंगत झाली.

नंददास, चंद्रहास ही मंडळी रामपूरला राहात तर तुलसीदास, रत्नावली सूकरक्षेत्रातच राहात असत. काव्यशास्त्र विनोदात त्यांच्या काळ फार आनंदात जाई. प्रतिदिन संध्यावंदनादि नित्यकर्मे करून गृहस्थ धर्माचे पालन करीत असत. घरी श्रीराम मूर्ती होती. तिची प्रातःसायं मोठ्या प्रेमाने पूजाअर्चा चाले. वारंवार रामनाम उच्चारण्याचा अभ्यास तर होताच. तुलसीदास भगवत्-भक्ताच्या घरी पुराण सांगून धन आणि प्रतिष्ठा प्राप्त करीत. शिवाय शेतीही करीत; असे 'तुलसी प्रकाश' वरून दिसते. रत्नावली नित्य मधुर भाषणाने पतीस संतुष्ट करीत असे. नित्यप्रती पतीचे चरण-संवाहन करून प्रेमपूर्वक सर्व सेवा करी. पति आज्ञेनुसार तिचे वर्तन असे आणि सदैव पतिसेवेतच तिला आनंद आणि उत्साह वाटे. पतिवियोग तिला क्षणभरही रूचत नसे. अशा या अनुरूप दांपत्यास 'तारापति' किंवा 'तारक' नावाचा एक पुत्रही झाला. तो बाळसेदार आणि बुद्धिमानही होता पण दैवयोगाने तो बालपणीच गेला. रत्नावलीस त्यायोगे फार दुःख झाले पण पतीच्या मुखाकडे पाहून तिने धीर धरला आणि पुत्रशोकाचे दुःख दूर सारले.

## रत्नावलीचे उत्कट प्रेम

तुलसीदासास आधीच रत्नावली फार प्रिय होती. या प्रसंगानंतर ते तिच्याबाबत अधिकच हळवे बनले. ते तिला जराही दृष्टिआड होऊ देत नसत. जरा ती दृष्टीस पडली नाही तर त्यांचे मन बेचैन होई. (ज्यांना बालपणी मातृसुख मिळालेले नसते ते पुरुष स्वस्त्रीविषयी अधिक अनुरक्त असतात की काय?) दिवसेंदिवस स्त्रीमध्ये अधिकाधिक अनुरक्त होण्याने त्यांच्या साधनातही जरा सुस्तता, ढिलाई आली. असे करता करता त्यांच्या विवाहास पंधरा वर्षे झाली. तुलसीदासांचा विवाह झाला तेव्हा ते एकवीस वर्षाचे व रत्नावली बारा वर्षाची होती. लग्नानंतरच्या या दीर्घकाळात तिला पतीने कधी माहेरी जाऊच दिले नाही. मात्र एक पुत्रशोक सोडला तर त्या उभयतांचा हा काळ अत्यंत आनंदात गेला असेच म्हणावे लागेल. 'श्रीरामचरितमानसा'त ठिकठिकाणी व्यक्त झालेले दांपत्य प्रेमाचे वर्णन या स्वानुभवावर आधारित असेल काय? सुंदरकांडात त्यांनी, रामानी हनुमंताबरोबर जो संदेश सीतेस धाडल्याचे वर्णन केले आहे त्यातील 'तत्त्व प्रेम कर मम अरु तोरा। जानत प्रिया एकु मनु मोरा। सो मनु सदा रहत तोहि पाही। जानु प्रीति रसु एतनेहि माही॥' अशी प्रेमाची उत्कटता वर्णिली आहे; ती काय सुचवते? तुलसी साहित्यातील, उत्कट असून संयमित अशी बहारदार श्रृंगारवर्णने त्यांच्या स्वानुभवाची द्योतक असावीत असे मनात आल्याखेरीज राहात नाही. रामाच्या विरहव्यथेचे त्यांनी केलेले वर्णन पहाण्यासारखे आहे. 'कार्येषु मंत्री, करणेषु दासी' यांत वर्णन केल्याप्रमाणे षड्गुणवती अशी दुर्लभ पत्नी तुलसीदासांना लाभली होती. तो दुग्धशर्करा योग अथवा मणि-कांचन योगच असल्याने तुलसीदास भार्येवर अत्यंत अनुरक्त झाले! बालपणातील रामप्रेमात थोडी शिथिलता आली. रामरंगात रंगण्याऐवजी ते रमारंगात रंगून गेले! 'आधी प्रपंच करावा नेटका, नेटका करता होतो फिका तसा - नेटका प्रपंच करीत असतानाच तो अचानक फिका पडला!

एका वेळेची गोष्ट आहे. रत्नावली, राखी बांधण्यासाठी आपल्या पतीची आज्ञा घेऊन, त्यास प्रणाम करून, मन प्रसन्न करून आपल्या भावाबरोबर माहेरी गेली. तुलसीदासांना रामकथा वाचण्यासाठी नऊ दिवस परगावी जावयाचे होतेच. कथासमाप्ती नंतर ते अकरा दिवसांनी घरी परत आले. पण रत्नावली घरी नसल्याने घरात त्यांचे मन रमेना. रत्नावलीला पहाण्याची, भेटण्याची उत्कट इच्छा झाली आणि उत्साहाच्या भरात ते आपल्या सासुरवाडीकडे निघाले. दैव हे फार बलवान आहे, ज्यावेळी जे घडायचे ते घडतेच! स्त्रीला भेटण्याच्या अनिवार ओढीने तुलसीदासांना वेळेचेही भान राहिले नाही. त्यावेळी भाद्रपद महिना होता. जवळ जवळ मध्यरात्र झाली होती. आकाशात मेघांची दाटी झाली होती. वीजांचा कडकडाट चालू होता. गंगेचे पाणी दुथडी भरूनवहात होते. त्यांनी सरळ नदीत उडी घेतली आणि पोहून पलीकडे जाऊन सासुरवाडी गाठली. तेथे पोहोचताच हाका मारून सगळ्यांना उठविले! त्यांना पाहून त्यांच्या मेहुण्यांना आश्चर्याचा धक्काच बसला. त्यांनी कुशल वगैरे विचारून वेळेनुसार त्यांचा आदरसत्कारही केला. पण तुलसीदास मात्र मनात संकोचित झाले.

थोड्या वेळाने रत्नावलीने एकांत पाहून पतीसमीप येऊन वंदन केले आणि हळुहळु पाय चेपण्यास सुरवात केली. तिने विचारले, 'इतक्या रात्री का आलात? मेघ गर्जना करीत आहेत, पाऊस पडत आहे, गंगेचे पात्र कसे पार केलेत? मला खूप आश्चर्य वाटते आहे!'

तुलसीदास म्हणाले, 'तुला भेटण्याची प्रबल इच्छामनात निर्माण झाली, तुझ्याशिवाय चैन पडेना. हे सुमुखी, तुझ्या प्रेमामुळेच मी गंगेचे पात्र सहज पार करू शकलो!'

रत्नावली म्हणाली, 'माझ्यासारखी भाग्यवान, पतीला प्रिय अशी स्त्री या जगात दुसरी कोण आहे? तुम्ही प्रेमाची सीमा ओलांडलीत! माझ्या प्रेमाच्या ओढीने तुम्ही गंगापार केलीत तर जगदाधार श्री भगवंताच्या चरणांवर प्रेम केल्याने मनुष्य भव सागर सहज तरून जाईल!'

## वैराग्य प्राप्तीचा क्षण

हे विचार ऐकून तुलसीदास सखेदाश्चर्याने स्तब्ध झाले, विचारमग्न झाले! 'अस्थि चर्म मय देह मम, तामे जैसी प्रीती । तैसी जो श्रीराम महुँ, होति न तौ भवभीती' हा दोहा रत्नावलीचा म्हणून प्रख्यात आहे. ('लाज न आवत आपको, दौरे आयहु साथ। धिक धिक ऐसे प्रेमको कहा कहौ मै नाथ' याप्रमाणे प्रथम तिने धिक्कारले असे म्हणतात, पण काही विद्वानांना हे मत मान्य नाही! रत्नावलीसारखी पतिव्रता अशा शब्दात धिक्कारील का अशी शंका त्यांना वाटते). काही का असेना पत्नीच्या त्या उद्‌गाराने तुलसीदासांच्या रामप्रेमावर सांचलेले धुके वितळले. त्यांना स्वतःची घृणा वाटली. स्त्रीमोहाने प्रभुचरणांचा आपणास विसर पडला याची खंत वाटली. अत्यंत पश्चात्ताप झाला. त्यांची झोप उडाली. ते खऱ्या अर्थाने जागृत झाले. 'नरहरी, कांचन कामिनी यापासुनि अतिदूर। जरि इच्छी कल्याण निज, रामदरस भरपूर॥ या गुरुवचनाची स्मृती झाली. 'खेलत बालक व्याल सँग मेलत पावक हाथ। तुलसी सिसु पितु मातु ज्यो राखत सिय रघुनाथ (दोहावली ४७) असे मनात येऊन स्त्रीमोहात आपण फसत असता श्रीरामप्रभूंनीच तिच्या द्वारा आपणास सावध केले असावे

असे मनात येऊन, त्यांच्या मनात बालपणापासून रूजलेले रामप्रेम उफाळून वर आले! ते त्यावेळी काही बोलले नाहीत पण घरातील लोक झोपलेले पाहून ते सरळ तेथून निघून गेले!



॥५॥

# साधकावस्था आणि साक्षात्कार

गोस्वामींनी 'मानसात' म्हटल्याप्रमाणे 'राम कीन्ह चाहइ सोइ होई। करै अन्यथा अस नहिं कोई' (बालकांड दोहा १२८-१) असे असल्याने तुलसीदासांच्या मनाने एकदम पलटी खाल्ली! ते बदरी (बदरिया) हून जे थेट निघाले ते परत रामपूरला गेले नाहीत किंवा सोरोलाही गेले नाहीत. त्यांनी गंगेच्या किनाऱ्या किनाऱ्याने प्रवासास सुरवात केली. ही गोष्ट वि.सं. १६०४ मध्ये घडली. 'रत्नावलीचरित'प्रमाणे त्यांचा दुसरे दिवशी खूप शोध घेतला गेला पण पत्ता लागला नाही. सगळे लोक उदास झाले. रत्नावलीस अतिशय दुःख झाले. तिने कित्येक दिवस खाणेपिणे सोडले. दिवस लोटले, महिने गेले पण त्यांचा पत्ता नाही! तिने साजश्रृंगाराचा त्याग केला, उंची वस्त्रे प्रावरणे वापरणे सोडून दिले. पतीचरणाचे ध्यान करीत ती व्रतस्थ राहू लागली. सदैव ईश्वरभजनात काळ घालवू लागली. याप्रमाणे उत्तम कीर्ती मिळवून वि.सं. १६५१ मध्ये तिने देहत्याग केला. तिच्या पवित्र आचरणाने तिची कीर्ती इतकी पसरली की तिच्या चरणधुळीने आरोग्यप्राप्ती होते अशी सर्व लोकांची श्रद्धा बसली. तिने स्त्रियांसाठी दोहावली (२०१ दोहे) लिहिली असून ते दोहे अत्यंत सरस भावपूर्ण असे आहेत. मूलगोसाईचरितप्रमाणे दुसऱ्या दिवशी गाठ पडल्यावर मेहुण्याने परत फिरण्याबद्दल खूप आग्रह केला पण ते येत नाहीत असे पाहून तो परत फिरला व रत्नावलीने (त्यात नाव दिलेले नाही) पतिवाचून जगून काय करायचे म्हणून तात्काळ देहत्याग केला. (पण आता ही हकिकत कोणी खरी मानत नाहीत.)

## काशीस आगमन

तुळसीदास जे निघाले ते साधुवेष धारण करून तीर्थयात्रा करीत काशीला येऊन पोहोचले. तेथे आल्यावर नित्य गंगा स्नान, सतत रामनामजप व नित्य रामायण कथन हाच त्यांचा दिनक्रम असे. 'राम नाम मणिदीप धरू जीह देहली द्वार। तुलसी भीतर बाहरहुँ जो चाहसि उजिआर॥' 'नामु रामको कल्पतरु कलि कल्यान निवासु। जो सुमिरत भयो भाँग ते तुलसी तुलसीदासु॥' इत्यादि वचने वाचली की त्यांनी कसा काळ घालविला असेल त्याची कल्पना येते. रामनामाच्या प्रभावानेच भांगेसारखा अपवित्र तुळसीदास तुळसीप्रमाणे पवित्र झाला. 'रे मन सब सों निरस है सरस रामसो होहि। भलो सिखावन देत है निसि दिन तुलसी तोही' 'रामप्रेमपथ पेखिए दिएँ विषय तन पीठि । तुलसी केचुरि परिहरे होत साँपहू दीठि ॥' 'तुलसी जो लौ विषयकी मुधा माधुरी मीठि। तौं सुधा सहस्रसम राम भगति सुठी सीठि' 'दीप सिखासम जुबति तन मन जनि होसि पतंग। भजहि राम तजि

काम मद करहि सदा सतसंग' इत्यादि त्यांच्या साहित्यात विखुरलेली वचने त्यांच्या त्यावेळच्या मन:स्थितीची कल्पना देतात! विषयांकडे पाठ फिरविल्याखेरीज रामप्रेमाची प्राप्ती होणार नाही. जोपर्यंत विषयांतील मिथ्या सुख गोड वाटते तोपर्यंत सहज अमृताहून गोड अशी रामभक्ति फिकीच वाटते.

## हनुमंताचे पाय धर

असे म्हणतात की काशी क्षेत्रात मलत्याग करू नये असे वचन उपनिषदात आहे. त्यास अनुसरून गोस्वामी दूर जात असत आणि शौचानंतर अवशेष जल एका पिंपळाच्या वृक्षाला घालीत असत. त्याने संतुष्ट होऊन त्या वृक्षावरील पिशाच्याने प्रगट होऊन काय हवे ते मागून घेण्यास सांगितले. तुलसीदासांनी दशरथनंदन रामाच्या दर्शनाची इच्छा प्रगट केली. त्यावर वृक्षामधून आवाज आला की 'रामासंबंधी अनुराग वाढव' तुलसीदासांनी विचारले, 'और?' "(आणि?)" उत्तर मिळाले की "हनुमान द्वारा दर्शन होईल" नंतर तुलसीदासांनी विचारले, 'पहचान'? (हनुमानास ओळखू कसे?) उत्तर मिळाले की रामकथा ऐकताना ज्याच्या नेत्रातून प्रेमाश्रू वाहतील आणि शरीर रोमांचित होईल ते हनुमान समज.' 'यत्र यत्र रघुनाथ-कीर्तनं तत्र तत्र कृत मस्तकांजलिम्। बाष्पवारि-परिपूर्ण लोचनं मारुतीं नमत राक्षसान्तकम्॥' आख्यायिका अशी आहे की तुलसीदास रामकथा सांगत असता त्यांना श्रोत्यांमधे अशी व्यक्ती दिसली आणि हेच भगवान् रुद्राचे अवतार हनुमान आहेत हे जाणून कथासमाप्तीनंतर त्यांनी हनुमंताचे चरण धरले आणि त्यांना शरण गेले. 'जयति रामायण श्रवण संजात रोमांच लोचन सजल शिथिल वाणी, राम पद पद्म मकरंद मधुकर पाहि दास तुलसी शरण शूल पाणी।' (विनयपत्रिका २९) हनुमंतानी चरण सोडवून घेण्याचा प्रयत्न केला पण गोस्वामींनी, 'रामदर्शन घडवा, केवळ आपणच समर्थ आहात, तेव्हा एवढे कराच' असा हट्ट धरला. 'भगति पच्छ हठ नहि सठताई' यामुळे हनुमंतास आनंदच झाला। 'केवळ रामचरणिं लय लागे' अशी तुलसीदासाची स्थिती पाहून त्यांची प्रभुदर्शनलालसा पुरी करण्याचे ठरवून हनुमंतानी त्यांना चित्रकूटला जाण्याचा आदेश दिला.

## चित्रकूटास प्रयाण

तुलसीदास त्याप्रमाणे चित्रकूटला निघाले. अयोध्याकांडातील रामभेटीसाठी निघालेला भरत, तसेच अरण्यकांडातील सुतीक्ष्ण यांच्या मन:स्थितीचे त्यांनी जे वर्णन केले आहे त्याप्रमाणे यावेळी त्यांची स्थिती झाली असावी. स्वत:ची करणी आठवली की प्रभू आपल्याला दर्शन देतील किंवा नाही याबद्दल संदेह उत्पन्न होऊन गतीत शिथिलता यावी! परत प्रभूच्या ब्रीदाची व हनुमंताच्या आश्वासनाची आठवण झाली की अधीरता निर्माण होऊन 'पथी उतावीळ पाऊले' पडावी! याप्रमाणे चित्रकूटास तर येउन पोहचले तेथील दिनक्रम म्हणजे मंदाकिनीचे स्नान, देवदर्शन, रामायण पाठ, नित्यकर्म आणि निरंतरराममंत्राचा जप! 'पय अहार फल खाइ जपु राम नाम षट्मास। सकल सुमंगल सिद्धी सब करतल तुलसीदास' 'भव भुअंग तुलसी नकुल डसत ग्यान हरि लेत। चित्रकूट एक औषधी चितवत होत सचेत.' तुलसीदास निदान सहा महिने तरी तेथे राहिले असावेत. कदाचित जास्तही राहिले असण्याचा

संभव आहे. दोहावलींतील काही दोह्यांवरून असे अनुमान होते. गीतावलीत पद १७ अयोध्याकांड यातील चित्रकूट वर्णन वाचले की सर्वच ऋतूंत चित्रकूटची शोभा त्यांनी पाहिली असावीसे वाटते.

## रामदर्शन

एकदा ते चित्रकूट प्रदक्षिणेस निघाले असता मार्गात दोन अत्यंत सुंदर धनुर्धारी राजकुमार घोड्यावर बसलेले शिकारीस जाताना त्यांनी पाहिले. पण त्यांच्या रूपलावण्याने इंदू चकोरासम चित्त चकित झाल्याने ते त्यांच्याकडे एकटक पहातच राहिले आणि प्रणाम करणे इत्यादी सर्व राहूनच गेले. नंतर प्रभू अंतर्धान पावल्या वर मात्र जलविहीन माशाप्रमाणे ते तळमळू लागले आणि हनुमंतास विनंती केली की फिरून एकदा दर्शन घडवा. तेव्हां त्यांनी 'उद्या प्रातःकाळी दर्शन होईल' असे आश्वासन दिले. दुसरे दिवशी प्रातःकाळी चित्रकूटाला रामघाटावर गोस्वामी चंदन उगाळीत असता रामलक्ष्मणांनी परत दर्शन दिले. ते म्हणाले, "बाबा आम्हाला चंदन द्या!' परत आदले दिवशीप्रमाणेच तुलसीदासांची अवस्था झाली! तेव्हां त्यांना सचेत करण्यासाठी पोपटाच्या रूपाने हनुमंतानी पुढील दोहा म्हटल्याचे प्रसिद्ध आहे. "चित्रकूटके घाट पै भई संतन की भीर, तुलसीदास चंदन घिसे तिलक देत रघुवीर ॥ ' पण तुलसीदासांचे चित्त रूप मकरंदपान करण्यात सर्वस्वी बुडून गेले होते, डोळ्यातून अश्रुधारा वहात होत्या, 'हरपले मन झाले जन्मन' अशी स्थिती होती. तेव्हा रामचंद्रानीच भक्त तुलसीदासास चंदन लावले आणि स्वतःही लावून घेतले! तुलसीदासांना संकोचही वाटला आणि त्याचवेळी दशदिशा आनंदाने भरून गेल्याचा अनुभवही आला. इतक्यात प्रभू पुन्हा अंतर्धान पावले आणि तुलसीदास परत विरहाने माशाप्रमाणे तळमळू लागले. शेवटी हनुमंतास त्यांना सावध करावे लागले. या दिवशी माघ वद्य अमावास्या (मौनी अमावास्या) बुधवार वि. सं. १६०७ हा दिवस होता. (ई.सन. १५४९)

"चित्रकूट सब दिन वसत प्रभू सिय लखनसमेत, राम नाम जप जापकहि तुलसी अभिमत देत" (दोहावली ४)

"जाके गति है हनुमानकी! ताकी पैजि पूजि आई यह रेखा कुलिस पषान की" (वि.न. ३०) तसेच पद (वि.प. २६४).

"तुलसी! तोको कृपालु जो कियो कोसलपालु, चित्रकूटको चरित्र चेतु चित करि सो" (वि.प. २६३) इत्यादी उल्लेखांमधून चित्रकूटांतील त्या अविस्मरणीय प्रसंगाबद्दलच्या त्यांच्या भावना व्यक्त होतात. "मम दर्शन फल परम अनूप। पावे तात सहज निज रूप" असे प्रभूंनी म्हटल्याचे वर्णन मानसात आहे! यावरून प्रभूच्या साक्षात दर्शनाने तुलसीदासांना आत्मरूपाचे ज्ञान होऊन त्यांचे दिव्य ज्ञानचक्षूही उघडले असावेत! त्यांचे जीवन कृतार्थ झाले. काही मिळवायचे, प्राप्त करावयाचे असे राहिलेच नाही. येथून त्यांचे आयुष्य म्हणजे 'उरलो उपकारापुरता' अशा प्रकारचे म्हणावे लागेल.

यानंतर तुलसीदासांना खूप प्रसिद्धी मिळाली. चित्रकूटला बराच काळ त्यांचे वास्तव्य झाले. गोकुळ, मथुरा, वृंदावन इत्यादी ठिकाणाहून महात्मे येऊन त्यांच्या दर्शनाने कृतार्थ

होऊन जाऊ लागले. त्यांनी बरीच तीर्थयात्राही केली. (वि.सं. १६०७ ते वि.सं. १६२८) त्यांच्या साहित्यात यापैकी काही स्थानांचे वर्णन मिळते. उदाहरणार्थ कवितावली १४४ मध्ये त्यांनी प्रयागवर्णन केले आहे. कवितावली १३८ ते १४० यामध्ये सीता वटवर्णन आहे. हे स्थान म्हणजे सीतामढी म्हणून प्रसिद्ध असून प्रयाग आणि काशीच्या मध्ये आहे. हे स्थान म्हणजे वाल्मीकी ऋषींचा आश्रम तेथेच सीतेचा निवास झाला व लवकुशांचा जन्म झाला! असे म्हणतात की हे स्थान पाहून त्यांना पूर्वजन्मीची स्मृती झाली आणि त्यांची तहानभूक हरपली. तेथे त्यांनी तीन दिवस वास्तव्य केले होते व त्यावेळीच त्यांना कवित्व स्फुरले चित्रकूट वर्णन तर त्यांच्या प्रत्येक ग्रंथात आहे असे म्हणता येईल. याशिवाय त्यांनी अयोध्या, पुरी, रामेश्वर, द्वारका, हरिद्वार, बदरीनारायण, कैलास, मानससरोवर, मथुरा, गोकुळ, वृंदावन, दंडकारण्य, कुरूक्षेत्र, नैमिषारण्य, मिथिला वगैरे कित्येक तीर्थक्षेत्रांची यात्रा केली. याशिवाय याच काळात ते राजापूर येथेही बराच काळ वास्तव्य करून राहिले होते असे दिसते.

वि.सं. १६१६ मध्ये सूरदासांची व तुलसीदासांची भेट झाली होती असे म्हणतात. (ई. स. १५५९) पुढील पदांवरून ही गोष्ट खरी असावी असे वाटते.

धन्य भाग्य मम संत सिरोमनि चरण कमल तकि आयउँ ।

वदन प्रसाद सदन दृग भरि लखि संदोह समायऊँ ॥

दया दृष्टि ते मम दिसि हेरेउ तत्त्वस्वरूपलखायो ।

कर्म उपासन ज्ञानजनित भ्रम - संसय मूल नसायो ॥

हरिलीला गायो तेहि सुनि तनु पुलकित मानस धीर ।

सुधा समान बचन कहि पोषउ सुमिरत सिय-रघुवीर ॥

श्री तुलसि सुचि संत-समागम अद्‌भूत अमल अनूप ।

सूरदास जीवन फल पायो दरसन जुगल-स्वरूप ॥

(हे काव्य १९३८ ई. सनच्या कल्याणच्या 'मानसांक' या विशेषांकात पृष्ठ २ वर प्रसिद्ध झाले होते. गोस्वामींच्या काव्यात मात्र या भेटीचा उल्लेख नाही.)

## मीराबाईचा पत्रव्यवहार

याच काळात मीराबाईने पुढील पत्र गोस्वामींना धाडले होते.

(हिंदी साहित्यका इतिहास, पं.रामचंद्र शुक्लकृत, पृष्ठ १८४-१८५)

स्वस्ति श्री तुलसी कुलभूषण दूषण हरन गोसाई ।

वारहिवार प्रनाम करहुं, अब हरहु सोक समुदाई ॥

घर के स्वजन हजारे जैते सबन्ह उपाधि बढाई ।

साधु संग अरू भजन करत मोहि देत कलेस महाई ॥

मेरे मात पिता के सम हो, हरि भक्तन सुखदाई ।

हम को कहा उचित करि बो है, सो लिखिए समझाई ॥

याचे उत्तर म्हणून तुलसीदासांनी पुढील काव्य लिहून धाडले.

"जाको प्रिय न राम वैदेही

तजिये ताहि कोटि वैरी सम जद्यपि परम सनेही ॥ १ ॥

तज्यो पिता प्रहलाद, बिभीषन, बंधु, भरत महतारी।

बलिगुरुतज्यो कंत व्रज बनितन्हि, भये मुद मंगलकारी ॥ २ ॥

नाते नेह रामके मनियत सुहृद सूसेव्य जहाँ लौ।

अंजन कहा आँखि जेहि फूटै, बहुतक कहौं कहाँ लौ ॥ ३ ॥

तुलसी सो सब भाँति परम हित पूज्य प्रानते प्यारो।

जासो होय सनेह राम-पद, एतो मतो हमारो ॥ ४ ॥

ही घटना खरी असावी. कारण भारतेंदु हरिश्चंद्र यांच्या मते मीराबाईचा मृत्यु सं. १६२० ते १६३० च्या दरम्यान झाला. 'बृहत् काव्य दोहन' मध्येही असेच मानले आहे. (मीरेचे निधन ई.सन १६०२ मानतात. म्हणजे त्यावेळी वि.सं. १६१९-२० येतो.)

वि.सं. १६०७ मध्ये गोस्वामींना श्रीरामदर्शन घडले आणि वि.सं.१६३१ मध्ये 'श्रीरामचरित मानसा'च्या रचनेस आरंभ झाला. त्या मधल्या काळात 'रामलला-नहछू' वि.सं. १६११-१२ च्या सुमारास, वैराग्य संदीपनी वि.सं. १६१४ च्या आसपास, रामाज्ञा- प्रश्न वि.सं. १६२१ च्या सुमारास आणि जानकी-मंगल सं. १६२७ च्या सुमारास लिहिले गेले असे बहुतेक विद्वानांचे मत आहे. काव्यदृष्ट्या ते ग्रंथ 'मानसा' पेक्षा निकृष्ट प्रतीचे आहेत असे म्हणतात.



॥६॥

# 'श्रीरामचरित मानसा'ची रचना

तीर्थयात्रा करून गोस्वामीनी काशीत येऊन वास्तव्य केले. तेथे राहिलेले असताना वारंवार रामायण रचना करण्याची वृत्ती उठू लागली म्हणून त्यांनी काशीतच काही रचना संस्कृतमधून करण्यास सुरूवात केली. असे सांगितले जाते की, दिवसा लिहिलेले रात्री लुप्त होई; असा क्रम आठ दिवस चालला. आठव्या दिवशी रात्री स्वप्नात शिवपार्वतीनी दर्शन देऊन आज्ञा केली की 'अयोध्येत जाऊन जनकल्याणार्थ भाषेत (हिंदीत) रामायण रचना कर. माझ्या प्रसादाने तुझी रचना सामवेदाच्या ऋचेसारखी सफल होईल.' "सपनेहुँ साचेहुँ मोहि पर जौ हर गौरि पसाउ। तौ फुर होउ जो कहहुँ सब भाषा भनिति प्रभाउ॥ " (मानस बा.कां.१५) असे त्यांनी म्हटलेही आहेच.

त्या आदेशाप्रमाणे गोस्वामी लगेच काशीहून अयोध्येस आले. (वि.सं.१६२८) अयोध्येस आल्यावर तेथे नित्यक्रम म्हणजे नित्य शरयूस्नान, देवदर्शन आणि मग अयोध्येच्या गल्लीगल्लीतून, वनोपवनांतून श्रीरामप्रभूंच्या लीला आठवत हिंडत राहाणे. एके दिवशी त्यांना एक संत भेटले आणि एका रम्य एकांत स्थानी घेऊन गेले. तेथे एक विशाल वटवृक्ष होता आणि त्याच्या खाली एक सुंदर सुविशाल वेदी होती. त्यावेदीवर एक महान तेजस्वी सिद्धपुरुष बसलेले होते. तुलसीदासांना ते स्थान आवडले आणि तेथेच कुटी बांधून राहावे अशी इच्छा झाली. तुलसीदासांना पाहताच ते सिद्धपुरुष आसन सोडून त्यांच्याजवळ आले; आणि आपण आपल्या गुरूंच्या आज्ञेने येथे राहात होतो व त्यांनी सांगितले होते की एक दिवस तुलसीदास येथे येईल आणि या सिद्धपीठाच्या ठिकाणी रामकथा सांगेल; त्यावेळी हे स्थान त्याच्या स्वाधीन करून तू माझ्याकडे ये. त्याप्रमाणे मी येथे राहून आपलीच प्रतिक्षा करीत आहे. असे म्हणून तेथून उठून त्याने योगाग्नीने देह भस्मसात केला. ही गोष्ट तुलसीदासांच्या डोळ्यादेखतच घडली असावी. (अरण्यकांडात शरभंग आणि शबरी या दोघांनी आणि बालकांडात सतीने योगाग्नीने देहत्याग केल्याचे वर्णन मानसात आले आहे) भगवदिच्छा जाणून तुलसीदास तेथे राहू लागले. केवळ एक वेळ दूध, किंवा पाणी पिऊन श्रीरामचिंतनात त्यांनी दोन वर्षांहून अधिक काळ तेथे काढला.

विक्रम सं. १६३१, चैत्र महिना, शुक्लपक्ष, मंगळवार आणि रामनवमी असा योग जुळून आला; आणि शिवाज्ञेने तुलसीदासांनी आपल्या 'श्रीरामचरित मानस' ह्या लोकप्रिय ग्रंथाच्या रचनेस प्रारंभ केला. 'सिर धरि गुर पद पंकज धूरि' श्रीगुरूचे पदरज मस्तकी धारण करून, शिवाय नमन करून कथेस आरंभ केल्याचा उल्लेख केला आहे. 'संवत सोरह से एकतीसा। करउँ कथा हरि पद धरि सीसा॥ नौमी भौम बार मधु मासा। अवधपुरी यह चरित प्रकासा॥ जेहि दिन राम जनम श्रुति गावहि। तीरथ सकल तहाँ चलि आवहिं॥' अशा वेळी आरंभ झाला. 'मूलगोसाईचरित' प्रमाणे तसेच 'साई' मताचे प्रवर्तक मोहन साई यांच्या गीतरचनेनुसार मानस निर्मितीस एकूण दोन वर्षे, सात महिने, आणि सव्वीस दिवस इतका काळ लागला. वि.सं. १६३३, मार्गशीर्ष, शुद्ध पंचमीस, सीताराम -विवाह तिथीस हा महान ग्रंथ लिहून पुरा झाला. तुलसीदासांना ह्या ग्रंथामुळेच अमाप प्रसिद्धी मिळाली!

## सन्मान प्रसिद्धी

विश्वसाहित्यात 'श्रीरामचरितमानसा' सारखे ग्रंथ फार मोजके आहेत. महान् साहित्य देश, काल, मर्यादा ओलांडून सर्व जगात आदरणीय ठरते. ते आपल्या युगाचे प्रतिनिधित्व तर करतेच पण त्याचवेळी मानवी मनाच्या सार्वभौम सत्याची अभिव्यक्ती त्यात झालेली असल्याने त्यास आपोआपच आंतरराष्ट्रीय स्वरूप येते. 'मानसा'च्या निर्मितीनंतर आपल्या जीवनकालातच ते वाल्मीकीचे अवतार मानले जाऊ लागले.

"जातिके सुजाति के कुजाति के पेटागि बस,
खाए टूक सब के बिदित बात दुनी सो।
मानस बचन काय किए पाप सति भाय।

राम को कहाय दास दगाबाज पुनि सो।

रामनाम को प्रभाउ पाउ महिमा प्रताप

तुलसी से जग मानियत महामुनी सो ॥

(कवितावली उत्तरकांड ७२)

ज्या स्थानी तुलसीदासांनी 'मानसा'ची रचना केली, ते स्थान हल्ली 'तुलसीचौरा' म्हणून अयोध्येत प्रसिद्ध आहे. मानस रचनेनंतर त्या स्थानी विष्णू व श्रीरामपंचायतन यांच्या मूर्तीची स्थापना करण्यात आली होती आणि मिर्झा मानसिंह यांनी तेथे फरशी वगैरे घालून देऊन छत्री वगैरे बांधून दिली होती. मोठ्या थाटामाटाने उत्सव, पूजा वगैरे होत असे. पुढे कुणा मुसलमान सुभेदाराने औरंगजेबाच्या काळात फरशी वगैरे उखडून टाकून तेथील रत्नजडित छत्री वगैरे काढून नेली. व पुढे कालांतराने तो वटवृक्षही उन्मळून पडला अस 'मोहन साई' यांनी वर्णिले आहे. 'मानस' रचनेनंतर तुलसीदास काशीत आले. ते आल्यावर प्रथम प्रल्हाद घाटावर राहात असत. तेथेच राहणारे ज्योतिषी गंगाराम हे त्यांचे पूर्वीपासून मित्र होते. व त्यांच्यासाठी तुलसीदासांनी 'रामाज्ञा प्रश्न' हा ग्रंथ लिहिला असे म्हणतात. काशीत आल्यावर त्यांनी भगवान् विश्वेश्वर आणि अन्नपूर्णा यांना 'श्रीरामचरितमानस' वाचून दाखविले. अशी आख्यायिका आहे की, रात्री ग्रंथ श्रीविश्वेश्वराच्या सन्निध ठेवण्यात आला प्रातःकाळी उपस्थितांसमोर देवद्वार उघडले आणि पाहतात तो ग्रंथावर 'सत्यं, शिवं, सुंदरं' असे लिहिलेले होते आणि खाली 'शंकर' अशी सही होती. एवढेच नव्हे तर सर्वांनी हे शब्दही आपल्या कानानी ऐकले. भक्तमंडळींना आनंद झाला. आणि काशीत चहूकडे ही बातमी पसरली. तुलसीदासांचे (चुलतबंधु आणि गुरूबंधु) समकालीन महाकवी नंददास यांच्या पुढील पदांवरून यास पुष्टी मिळते. (श्रीप्रभुदयाल मीतलकृत 'अष्टछाप परिचय' मध्ये पुढील पद दिले आहे.)

'श्रीमत्त तुलसीदास स्वगुरु भ्राता पद वंदे।

शेष सनातन विपुल ज्ञान जिन पाइ अनंदे॥

रामचरित जिन कीन, तापत्रय कलि-मल-हारी।

करि पोथीपर सही, आदरेउ आप पुरारी॥

राखी जिनकी टेक, मदनमोहन धनु धारी।

बालमीक अवतार कहत जेहि संत प्रचारी।

नंददासके हृदय नयनको खोलेउ सोई।

उज्ज्वल रस टपकाय दियो, जानत सब कोई॥'

नाभादास यांनी तुलसीदासांना भक्तमालेचा सुमेरू म्हटले असून भक्तमालेमध्ये त्यांना आदि कवी वाल्मीकीचा अवतार म्हटले आहे.

'त्रेता काव्य निबन्ध करिव, सतकोटि रमायन।

इक अच्छरउच्चरे, ब्रह्महत्यादि परायन।

पुनि भक्तन सुख देत, बहुरि लीला विस्तारी।
राम चरन रस मत्त रहत, अहनिसि व्रतधारी।
संसार अपारके पार को, सुगम रूप नौका लए।
कलि कुटिल जीव निस्तार हित, बालमीक, तुलसी भए॥ १२९॥

काशीतील पंडितांना तुलसीदासांची प्रसिद्धी व सन्मान सहन झाला नाही. त्यांनी नानाप्रकारे तुलसीदासांना छळले. त्या काळी स्वामी मधूसूदन सरस्वती हे महान् विद्वान होते. त्यांच्याकडे ही पंडित मंडळी गेले आणि त्यांनी स्वामींना 'श्रीरामचरितमानसा' संबंधी त्यांचा अभिप्राय देण्याविषयी गळ घातली. वाल्मीकी रामायणापेक्षा श्रीरामचरित मानसात बऱ्याच गोष्टी भिन्न असल्याने पंडितांना कदाचित् त्यांचा अभिप्राय आपणास अनुकूल मिळेल अशी आशा वाटली असावी. पण स्वामींनी ग्रंथ अथपासून इतिपर्यंत अवलोकन करून खालील अभिप्राय दिला.

'आनंद - कानने ह्यस्मिन्, तुलसी जंगमस्तरू: कवितामंजरी यस्य, रामभ्रमर भूषिता' अशा रीतीने त्यांनी एकप्रकारे तुलसीदासांचा गौरवच केल्याने पंडित मंडळी मनात खजील झाली.

'घर-घर मांगे टूक पुनि, भूपति पूजेपाय' । जो तुलसी तब राम बिनु सो अब राम सहाय। ' (दोहावली १०९) या वचनांवरून राजेलोकही मुद्दाम तुलसीदासांच्या दर्शनास येत असावे असे दिसून येते. एकीकडे याप्रमाणे सन्मान, प्रसिद्धी प्राप्त होत असताना दुसरीकडे त्याच वेळी तुलसीदासांना अनेक अडचणींना तोंड द्यावे लागले.

## विरोधकांनी केलेला छळ

श्रीरामचरितमानसाच्या रचनेनंतर तुलसीदासांनी काशीतच कायमचे वास्तव्य केले. वेळोवेळी ते विविध तीर्थयात्रेस गेले तरी परत काशीलाच येऊन राहात. काशी त्यांना फारच प्रिय होती. 'मानसा'त किष्किंधाकांडात' 'मुक्ति जन्म महि जानि, ज्ञान, खानि, अघ-हानिकर। जहँ बस संभु-भवानि, सो कासी सेइय कस न ॥ ' (मंगलाचरण) असे त्यानी म्हटले आहे. मात्र काशीतील त्यांच्या वास्तव्यात त्यांच्या विरोधकांनी त्यांना नाना प्रकारे छळले हे मात्र खरे. 'श्रीरामचरितमानसा'चा जसा अधिकाधिक प्रचार आणि प्रसार होऊ लागला तसा तसा छळ वाढू लागला. काशीत शिवाचा जयजयकार होण्याऐवजी तुलसीदासामुळे रामोपासकांची संख्या कदाचित् वाढू लागली असेल. तसेच तेथील प्रतिष्ठित विद्वानांना आपणांस कुणी विचारणार नाही असे भय वाटले असेल. तसेच संस्कृतज्ञ पंडितांच्या उपजीविकेस बाधा उत्पन्न झाली असण्याचाही संभव आहे. वाल्मीकी रामायण व तुलसीरामायण यांतही थोडाफार फरक असल्याने काही लोक मानसास मान्यता देण्यास तयार नव्हते. तुलसीदास स्वत: शिवभक्त होते व मानसातही शंकर भजनाचा महिमा त्यांनी भरपूर वर्णन केला आहे. पण काशीतील शिवाच्या एकाधिपत्यास त्यांच्यामुळे बाधा आली असे अनेकांना वाटून त्यांनी, विशेषत: कट्टर शैवांनी त्यांचा भरपूर छळ केला. रामचरितमानसाच्या चोरीचा प्रयत्न झाला; जारण, मारण यांचे प्रयोग झाले. एवढेच नव्हे

तर त्यांना जातिबहिष्कृत करण्याचे, तसेच त्यांच्यावर मारेकरी घालण्याचाही प्रयत्न झाला. कुठल्या तिथीला वा कुठल्या कारणाने विरोध झाला याचा उल्लेख नाही, पण दोहावली १४४, १४५, १४६, ३८७, ३८८, ३८९, ४९८, ५४५ मध्ये तसेच सतसई सर्ग ७ मध्ये, विनयपत्रिका पद ७६ व कवितावली उत्तरकांड इत्यादि अनेक ठिकाणी तुलसीदासांनी या छळाचा उल्लेख केला आहे.

चोरांना बक्षिसाचे आमिष दाखवून 'मानसा'ची चोरी करण्यास सांगण्यात आले. पण त्यांना तुलसीदासांच्या कुटीवर दोन धनुर्धारी पहारेकरी पहारा देत आहेत असे दिसल्याने, ताटकळून चोर निघून गेले. तुलसीदासांना हे कळले तेव्हां 'मजकारणें शीण' रघुराजाला झाला असे वाटून त्यांना फार वाईट वाटले. व त्यांनी आपला मित्र टोडर यांजकडे रामायणाची मूळ प्रत संरक्षणासाठी देऊन इतर वस्तू दान देऊन टाकल्या अशी आख्यायिका आहे. यानंतर 'मानसा'च्या अनेक हस्तलिखित प्रती केल्या जाऊन उलट अधिकच प्रचार झाला. 'समाचार साथ के अनाथनाथ कासों कहौं नाथही के हाथ सब चोरहु पहरु' (वि.प. २५० पद हा उल्लेख कदाचित् या घटनेस अनुलक्षून असेल.

असे सांगतात की एक ब्रह्महत्येचे पातक लागलेला ब्राह्मण त्यांच्या आश्रमाजवळ उभा राहून रामनामाचा गजर करू लागला. तेव्हा आपल्या इष्ट देवतेचे नाम ऐकून तुलसीदासांना प्रेमाचे भरते आले आणि त्यांनी धावत जाऊन त्या ब्राह्मणास मिठी मारली आणि आश्रमात आणून मोठ्या प्रेमाने जेऊखाऊ घातले. रुढीप्रिय ब्राह्मणांना हे न आवडून त्यांनी तुलसीदासांविरूद्ध काहूर उठविले. त्यांच्या जातिपातीबद्दल अफवा उठविल्या. 'लोग कहैं पोच सो न सोच न सकोच मेरे, ब्याह न बरेखी जाति पाँति न चहत हौं (वि. प. ७६, 'धूत म्हणा, अवधूत म्हणा, रजपूत म्हणा किंवा विणकर म्हणा, मला कुणाच्या मुलीशी माझ्या मुलाचे लग्न करून द्यावयाचे नाही किंवा कुणाची जात बिघडवायचीनाही. तुलसी तर रामाचा गुलाम आहे. ज्याला जे वाटेल ते त्याने म्हणावे. मागून खायचे, मशिदीत झोपायचे, कुणाचे काही एक घ्यायचे नाही की द्यायचे नाही.' कुणी दगाबाज समजतात, कुणी रामभक्त समजतात, साधु महासाधु समजतात तर खल आहेत ते महाखल समजतात, खऱ्याखोट्या अनेक अफवा उठत आहेत. कुणाकडून तुलसी कशाची इच्छा करीत नाही, किंवा कुणाला प्रत्युत्तरही देत नाही, सर्वांचे बोलणे सहन करीत आहे. तुलसीदासांचे बरेवाईट सर्व रघुनाथाच्या हाती आहे असे ते म्हणतात. 'साही'चे गोत्र तेच तुलसीदासांचे असेही उत्तर त्यांनी दिले आहे. (कवितावली उत्तरकांड १०६ ते १०८) यावरून तुलसीदास हे वर्णाश्रमधर्माचे पुरस्कर्ते असले तरी समतावादी होते असे दिसून येते. जातीपाति संबंधीची कट्टरता त्यांच्या ठिकाणी नव्हती. त्यांचे मित्र, स्नेही सर्व जातींत व समाजाच्या सर्व थरातील लोक होते. गंगाराम ज्योतिषी, खानखाना अब्दुलरहीम, आमेरचे राजा मानसिंह, व भदैनीचे जमीनदार टोडर हे तुलसीदासांचे खास मित्र होतेच. शिवाय त्यांचा मित्र मेधा भगत ह्याच्या सहाय्यानेच त्यांनी रामलीला आणि कृष्णलीला चालू केली. काशीची 'लंकावाली रामलीला' आणि असीची 'नागनथैयावाली कृष्णलीला' ही तुलसीदासांची जिवंत स्मारके आहेत.

## कलीस विचारणा

कट्टर शैवांचा जो विरोध झाला त्याबद्दल तुलसीदासांनी भगवान् विश्वेश्वरासमोर फिर्याद मांडली आहे. (कवितावली उत्तरकांड मध्ये १६५, विनयपत्रिका ५६८) ते म्हणतात, 'हे वामदेवा! मी आपल्या गावात राहातो, मी आपल्या जवळ कधी काही मागितले नाही. आता तुझे हे सेवक गण आधिभौतिक कष्टाच्या रूपाने मला त्रास देत आहेत. आपण त्यांना बोलावून घेऊन त्यांच्या या कठोर कर्मासाठी त्यांना चांगली ताकीद द्या, कारण की हे दुष्ट तुलसी दासरूपी तुलसीचे रोप (उपटून) तुडवून त्याजागीं शाखोटीचे रोप लावण्याची इच्छा करीत आहेत (वि.प. ८)' "मी आपल्या पुरीत राहून गंगाजळ सेवन करतो आणि रामनाम घेऊन तुकडे मागून पोट भरतो. तुससी कुणास कांही देऊ शकत नाही, पण कुणाचे कांही घेतही नाही. माझ्या भाग्यांत चांगुलपणा लिहिलेला नाही पण मी कुठही वाईट गोष्ट तर करीत नाही; इतक्याउपरही आपला भक्त म्हणविणारा कोणी माझ्यावर जुलूम, अत्याचार करतो आहे म्हणूनच त्या अत्याचाराविरूद्ध तक्रार मी दीन होऊन आपल्या द्वारी करतो आहे. हे काशीनाथ! (माझ्या प्रभू रामचंद्रानी तुम्हांला कुणी बोल लावला की मग मला दोष देऊ नका. (की मला आधीच कां तुला त्रास दिल्याचे कळविले नाहीस!) असे होऊ नये म्हणून मी आधीच माझी तक्रार नोंदवून जबाबदारीतून मुक्त होतो!"

"भूतनाथ, आपल्याला तर भूत, प्रेत, पिशाच्च प्रिय आहेत, आपल्या समाजाला आपण चांगले जाणतां, त्यांचे वेष, वाहने, अलंकार, वस्त्रे, निवासस्थाने, खाणेपिणे, बळी आणि पूजाविधी अनेक प्रकारचे आहेत, त्यांचे कोण वर्णन करूं शकेल? रामदासांचा व्यवहार आणि प्रेम तर अगदी साधे सरळ असते. ते सर्वांवर प्रेम करतात आणि सर्वांचा सन्मान करतात. (आता माझा सन्मान वाढत आहे हे पाहून भैरवाने (काशीचा कोतवाल) मला त्रास दिला यांत माझा काय अपराध आहे!) आपण उभयताच माझे मातापिता आणि गुरु आहांत, तेव्हां आपल्या योगेच माझी स्थिती सुधारली तर सुधारेल!"

असे म्हणतात की कलियुग मूर्तिमंत होऊन तुलसीदासांना त्रास देऊ लागले. कलियुगास उद्देशून केलेली अनेक पदे, कविता वगैरे तुलसीसाहित्यांत मिळतात. "मी तुझे काय बिघडले आहे, म्हणून मला त्रास देत आहेस?" अशी विचारणा केली असून अखेर हनुमंताकडे मदतीची याचना केली आहे. दोहावलीत १४४ ते १४६ दोह्यांतही या छळाचा उल्लेख असून "संकट तुलसीदास के राम करहिंगे दूरि" असा विश्वास त्यांनी व्यक्त केला आहे. "कोन की त्रास करै तुलसी, जो पै राखि है राम तौ मारिहै को रे?" (कविता उत्तर ४८) यावरून प्रत्यक्ष ठार मारण्याचे प्रयत्नही झाले यास पुष्टी मिळते. मात्र "तुलसीदास रघुवीर बाहुबल सदा अभय काहू न डरै।" असे त्यांनी स्पष्ट म्हटले आहे. आपल्या मार्गावरून ते जराही विचलित झाले नाहीत.

## 'गोसाई' उपाधी

गोस्वामींच्या 'हनुमान बाहुक' मधील छंदावरून ते स्वतः काही दिवस 'मठाधीश' बनले होते आणि त्याबद्दल पश्चातापही त्यांना झाला होता असे दिसते. डॉ. माताप्रसाद गुप्त यांच्या मते काशीमधील 'लोलार्क' कुंडाजवळ हा 'तुलसीदास मठ' वि. सं.१६९७ पर्यंत विद्यमान

होता. कुणी म्हणतात, त्यांनी शिष्यांना दीक्षा दिली होती आणि दीक्षागुरू 'गोसाई' म्हणून ही उपाधी लागली. कांहीच्या मते श्रीशंकर हे तुलसीदासांचे 'मानसगुरू' 'परात्पर गुरू' म्हणनच ही उपाधी लागली असावी. वैष्णव संप्रदायात 'गोसाई' म्हणत नाहीत. वल्लभ संप्रदायाचे परमाचार्य रुद्र भगवान आहेत आणि त्यातील सर्वांना गोसाई म्हटले जाते. वल्लभाचार्य आणि तुलसीदास समकालीन होते. काशीत, वल्लभसंप्रदायाच्या गोपाल मंदिरात ते बरेच दिवस रहात होते. तेथेच त्यांना 'गोसाई' उपाधी मिळाली असेल. 'तुलसी गोसाई भयो भोंडे दिन भूली गयो, ताको फल पावत निदान परिपाक हौं ॥ ' (हनुमान बाहुक ४०) त्यावेळच्या आपल्या विरुद्धाचरणांचा परिणाम म्हणजे आपली बाहुपीडा असे त्यांनी म्हटले आहे. 'गोसाई चरित,' 'मूलगोसाईचरित,' तसेच प्रियादासकृत भक्तमालवरील टीका या सर्व ग्रंथात असे वर्णन आहे की मोगल सम्राट जहांगिर याने मुद्दाम चमत्कार पहाण्यासाठी गोस्वामी तुलसीदासांना दिल्लीस बोलावून घेतले आणि चमत्कार दाखविण्यास सांगितले. तेव्हा गोस्वामींनी 'मैं केवल रामराम जपता हूँ । मेरे पास कोई चमत्कार नहीं। ' असे उत्तर दिले. या उत्तराने अप्रसन्न होऊन त्याने तुलसीदासांना कैदेत टाकले. त्यावेळी त्यांनी हनुमत्स्मरण करताच, तात्काळ वानरांनी चहूबाजूंनी सर्व नगर वेढून टाकले. सर्व कामकाज, हिंडणे-फिरणे सर्वांचे बंद पडले. तेव्हा बादशहाने क्षमायाचना करून तुलसीदासांना मुक्त केले. याबाबत 'उथपे थपन, थपे उथपन, पन बिबुध वृंद बंदि छोरको ॥ ' (१३ वि.प.) 'बंदिछोर बिरुदावली निगमागम गाई ॥ ' (वि. प. ३५) इत्यादी उल्लेखावरून तसेच तुलसीदासांनी 'महामहिपाल' म्हणजेच बादशहाची निर्भत्सना (दोहावली ५१५ मध्ये) केलेली असून त्यावरून, त्यांना बादशहातर्फे कांही ना काही उपद्रव झाला असावा असे निश्चित वाटते. मात्र मुस्लीम इतिहासकारांनी या घटनेचा उल्लेख केलेला नाही.

## रामभक्तीचा केवळ प्रचार

तुलसीदासजी एकदा व्रज येथे आपले बंधू नंददास यांना भेटण्यास गेले असता, नंददासांच्या विनंतीवरून श्रीकृष्णांनी तुलसीदासांना रामरूपात दर्शन दिल्याची हकिगत फार प्रसिद्ध आहे. 'दो सौ बावन वैष्णवन की वार्ता' मध्ये तसेच नंददासकृत पदांत या गोष्टीचा उल्लेख आला आहे. श्रीरामाशिवाय कुणापुढे तुलसीदास मस्तक नमविणार नाही म्हणून नंददासांनी अशी विनंती केल्याचा उल्लेख आहे. समर्थ रामदास यांच्या चरित्रातही अशी घटना पंढरपुरला विठ्ठलाने रामरूपात दर्शन दिल्याची व त्यांनी 'येथे उभा का श्रीरामा' हे पद केल्याची सांगितली जाते. त्या प्रमाणे 'आज की सोभा कहूँ, भले विराजो नाथ', तुलसी मस्तक तब नमे, धनुष्य-बाण लेओ हाथ' अशी नंददासांनी विनंती केली व त्याप्रमाणे रामरूपात दर्शन झाले असे 'वार्ता'त वर्णन आहे. यावरून गोस्वामींची अनन्यता दिसून येते. याशिवाय, प्रेतोद्धार, सती जाणाऱ्या स्त्रीच्या पतीस उठविणे, परिस देऊन दारिद्र्यमोचन करणे, दगडाच्या नंदीकडून ओला चारा खावविणे इत्यादी अनेक चमत्कारांचे वर्णन निरनिराळ्या चरित्रकारांनी केले आहे. पण या गोष्टीस महत्त्व नसून रामभक्तीचा संदेश देणे हेच त्यांच्या जीवनाचे जे ध्येय, ते गाठण्यासाठी त्यांनी आजीवन जे प्रयत्न केले ते महत्त्वाचे आहेत.



॥७॥

# काशी निवास

गोस्वामी दीर्घायुषी होते. त्यांचा निवास काशीत जवळ जवळ वि.सं. १६३३ ते वि.सं. १६८० असा ४७ वर्षे होता. या काळात त्यांच्या आयुष्यात दोनदा 'रुद्रबीसी' (रुद्रविंशति) आली आणि दोनदा त्यातच मीनेचा शनी आला. प्रथम वि.सं. १६२३ ते वि. १६४२ रुद्रविंशति होती आणि त्यातच चैत्र शुद्ध पंचमी वि.सं. १६४० मध्ये मीनराशीत शनीने प्रवेश केला तो ज्योष्ठ वि.सं. १६४२ पर्यंत मीनेस होता. यावेळी विषूचिका महामारीने काशी संतप्त झाली होती आणि गोस्वामींनाही व्यक्तिगत रोग व इतर छळादि सर्व प्रकारे अत्यंत त्रास झाला. वि.सं. १६४३ नंतर गोस्वामींची प्रतिष्ठा उत्तरोत्तर वाढतच चालली. दुसऱ्यांदा रुद्रविंशति वि.सं. १६५५ ते वि.स. १६७५ पर्यंत होती आणि त्यातच चैत्र शुक्ल द्वितीया वि. सं. १६६९ ते ज्येष्ठ वि.स. १६७१ पर्यंत मीन राशीस शनी होता. (श्री, सुधाकर द्विवेदी यांच्या मते) यावेळच्या रुद्रविंशतिमध्ये काशीत प्लेगचा उपद्रव सुरू होता व वृद्धावस्था व रोग यांनी गोस्वामींना ग्रासले होते. प्रथम त्यांना बाहुपीडा सुरू झाली आणि नंतर सर्व शरीरभर पीडा होऊ लागली. वेदनेची कारणे म्हणून वात, वृद्धावस्था, कलिकाल, भूत-प्रेत-बाधा वगैरेंचा उल्लेख त्यांनी केला आहे. आणि रामकृपेने पीडा शांत झाल्याचाही उल्लेख आहे. (दोहावली. १७८, २३४ ते २३६, विनयपत्रिका ४,१९५, कवितावली उत्तरकांड १६६, १६७, १७६ वगैरे मध्ये यासंबंधी उल्लेख आहेत).

'संकर सहर सर नर नारि वारिचर।  
विकल सकल महामारी माँजा भई है॥  
उछरत उतरात हहरात मरि मरि जात।  
भभरि भगात जल थल मीचु भई है॥  
देब न दयालु, महिपाल न कृपालु चित।  
वारानसी बाढति अनीति नित नई है॥  
पाहि रघुराज, पाहि कपिराज रामदूत।  
रामहू की बिगरी तुहीं सुधारि लई है।

अशा शब्दात त्यांनी काशीतील दुर्दशेचे, हाहा:काराचे वर्णन केले असून, हनुमंत आणि रामप्रभूंची करुणा भाकली आहे. शंकरांनी आपल्याच पुरीत आपल्या (संहार) कार्यास सुरूवात केली आहे, तेव्हा लोकांसाठी त्यांची करुणा तरी कशी भाकावी असा प्रश्न त्यांना पडला होता. असे म्हणतात की तुलसीदासांनी या काळात गोरगरीब, रोगग्रस्त यांची फार सेवा केली.

## असह्य बाहुपीडा

एक तो कराल कलिकाल सूत मूल तामें। कोढमें की खाज सी सनीचरी है मीनकी ॥ (उत्तरकांड कविता १७७) याप्रमाणे वर्णन केले असून याच काळात बाहुपीडा असह्य होऊन त्यांनी हनुमंताच्या स्तुतिपर 'हनुमान बाहुक' नावाचा एक ग्रंथ रचला. त्यात एकूण ४४ छंद आहेत. त्यात ते म्हणतात, 'साहसी समीरके, दुलारे रघुवीर जूके। बांह पीर महाबीर बेगि ही निवारिए ॥ २० ॥ त्यात बाहुपीडा हीच सिंहिका राक्षसीण, मगरी, लंकिनी, इत्यादि असून हनुमंतास तिचा नाश करण्याची विनंती केली आहे. शेवटी 'आन हनुमानकी, दोहाई बलवानकी। सपथ महावीरको, जो रहे पीर बांहकी' अशी शपथही घातली असून

'खायो हुतो तुलसी कुरोग राढ राकसनि।

केसरी किसोर राखे वीर बरि याई है ॥ ३५ ॥

तुलसी तनु-सर, सुख जलज, भुज-रुज गज बरजौर।

दलत दयानिधि देखिए, कपि-केसरी-किसोर।

असे रोगाचे शमनही सुचविले आहे. (दोहावली २३४)

कवितावली उत्तरकांड १६६, १६७, १६८ यात ते विश्वनाथ, काशीविश्वेश्वरास म्हणतात की, मी रामाचा दास, तुझे यश ऐकून तुझ्याजवळ गंगातीरी येऊन राहिलो आहे. तुम्ही रामाचे शील स्वभाव जाणताच. हे भूतनाथ अधिभूत, वेदना अत्यंत होत असून त्याने तुलसी विकल झाला आहे. 'मारिये तौ अनायास कासीबास खासफल, ज्याईये तौ कृपा करि निरुज सरीर हौ ॥ ' मला जीवनाची लालसा नाही, मरण्यासाठीच तर मी येथे येऊन राहिलो आहे. पण जिवंत ठेवायचे तर निरोगी शरीराने रामभक्त म्हणून जगवा, नाही तर स्पष्ट सांगतो की मला इच्छा मरण द्या. अर्थात् प्रसन्नतापूर्वक मरण द्या' कुणी म्हणतात की यातच केव्हांतरी एकदा त्यांच्या शरीरभर 'बरतोर'चे फोड उठले होते व त्यातून रक्त, पू वगैरेही वहात होते. 'तात तनु पेषियत घोर बरतोर मिस फूटि फूटि निकसत लोन रामरायको ॥ (हनु. बाहुक ४१)

## देहत्याग

एकंदरीत तुलसीदासांचे सर्व आयुष्यच संघर्षमय होते असे म्हणावे लागते. बालपण दारिद्र्याशी झगडण्यात गेले, तरुणपण विद्याप्राप्ती आणि धनप्राप्तीसाठी झगडण्यात, प्रौढावस्था मोहावर मात करण्यात आणि विरोधकांच्या छळास तोंड देण्यात गेली आणि वृद्धावस्था रोगाशी झगडण्यात गेली. पण सर्व परिस्थितीत त्यांचे भगवत्प्रेम आणि नीति दोन्ही अढळ राहिले, एवढेच नव्हे तर या सर्व प्रकारच्या अग्नीतून सुवर्णाप्रमाणे तावून सुलाखून अधिक उज्ज्वल स्वरूपात प्रकट झाले. त्यांनीच म्हटले आहे 'विघ्न कोटीने संतमन नीति सोडील काय?' तसेच रामायणात सुंदर कांडात 'म्हणे हनु प्रभू तीच विपत्ति। स्मरण भजन तव यदा न घडती' असे हनुमंताचे वचन दिले आहे. यावरून अखंड रामस्मरण आणि या रामरूप विश्वाची सेवा हे चालूच असल्याने त्यांच्या दृष्टीने पाहिले तर ह्या सर्व विपत्ती

नव्हत्याच असे म्हणावे लागेल. तुकाराम महाराजांनी म्हटल्याप्रमाणे 'फुटो हे मस्तक, तुटो हे शरीर, नामाचा गजर सोडू नये। नाशिवंत देह झाला जरि भस्म तरि कीर्तन रंग सोडू नये' हे व्रत मात्र तुलसीदासांनी निरंतर चालविलेले आपणास दिसते. त्यांचे एकूण बारा, तेरा ग्रंथ प्रख्यात असून यात रामलला नेहछू, रामाज्ञाप्रश्न, वैराग्य संदीपिनी, पार्वतीमंगल, जानकी-मंगल, बरवै रामायण, गीतावली, कृष्ण- गीतावली, विनय-पत्रिका, दोहावली, कवितावली, हनुमान-बाहुक आणि रामचरित मानस हे मुख्य आहेत. तुलसीदासांनी आपल्या मृत्युसंबंधी काही लिहिले नसले तरी अन्तसमयाचा संकेत त्यांनी जरूर केला होता. 'तुलसीदास अपनाइये कीजै न ढील अब जीवन अवधि अतिनेरे ॥ ' (विनय पत्रिका २७३) तसेच कवितावली उत्तरकांड १८० मध्ये 'पेखि सप्रेम पयान समय सब सोच विमोचन छेमकरी है ॥ ' या कवितेमध्ये 'महाप्रयाण'च सूचित केले आहे. तसेच कांही विद्वानांच्या मते 'संवत सोलह से असी, असी गंगा के तीर। श्रावण शुक्ला सप्तमी, तुलसी तज्यो शरीर' हा दोहा तुलसीदासांनीच मरणसमयी उच्चारला होता व त्याप्रमाणे स्वस्थ चित्ताने निश्चित समयी त्यांनी अनायास देहत्याग केला. 'राम-नाम-जस बरनि कै, भयउ चहत अब मौन। तुलसीके मुख दीजिये, अब ही तुलसी सोन' असे म्हणून त्यांनी देहत्याग केला असेही म्हटले जाते. आख्यायिका अशी असली तरी 'मूल गोसाई चरिता'स धरून 'संवत सोरह सै असी, असी गंगके तीर। श्रावनस्यामा तीज सनि, तुलसी तज्यौ शरीर' ही निधनतिथी हल्ली बरेच विद्वान मानतात. असे म्हणतात की याच तिथीस गोस्वामींचे मित्र टोडर यांचे वंशज अद्यापही ब्राह्मणास वार्षिक श्राद्धाच्या स्मृतीनिमित्त शिधा देतात. पण डॉ. रामदत्त भारद्वाज यांच्या मते 'श्रावण शुक्लसप्तमी' च योग्य आहे. कारण 'श्रावन स्यामा तीज सनि,' ही गणनेनुसार योग्य ठरत नाही. श्री. चिंतामणी भट्ट द्वारा वि.सं. १६७६ मध्ये रचलेल्या भावार्थदीपिका या भागवत टीकेत गोस्वामींचा मृत्यु श्रावणात कृष्ण तृतीयेस प्रातःकाली गंगातटाकी वि.स. १६८० मध्ये झाल्याचे वर्णन मिळते. (भारतीय पुरातत्त्व विभागाचे उपकर्णधार डॉ. एन.पी. चक्रवर्ती यांनीही ही तिथि गणनेनुसार योग्य ठरत नाही असा निर्णय दिल्याचा उल्लेख डॉ. भारद्वाज यांनी केला आहे).



॥८॥

# काही जीवन प्रसंग

गोस्वामींनी गृहत्याग केल्यानंतर त्यांच्या पत्नीने पुढील पत्र आपल्या पतीस लिहिले अशी आख्यायिका आहे.

'कटि की खीनी कनकसी, रहत सखिन संग सोइ।

मोहि फटे की डर नहीं, अनत कटे डर होइ॥ '

अर्थात् 'सडपातळ बांध्याची आणि सुवर्णासारखी कांती असलेली मी, आपल्या सख्यांसह राहात आहे आणि त्यांच्या सोबतीनेच झोपत आहे; माझे हृदय विदीर्ण होइल की

काय याची मला जराही काळजी नाही. पण आपण अन्यत्र कुठे फसणार तर नाही याचीच मला धास्ती वाटते.' याचे उत्तर गोस्वामींनी पुढीलप्रमाणे दिले.

'कटे एक रघुनाथ संग, बांधि जटा सिर केश।

हम तो चाखा प्रेमरस, पत्नी के उपदेश ॥'

अर्थात् 'मी केवळ एक रघुनाथांच्या प्रभावानेच प्रभावित झालो असून मस्तकावर जटाभार धारण केला आहे आणि आपल्या पत्नीच्या उपदेशाने भगवत-प्रेमरूपी रसाचे आस्वादन केले आहे!' याप्रमाणे उत्तर मिळाल्यावर अर्थातच तिला आनंद झाला.

## पत्नी रत्नावली

दुसरी अशी गोष्ट सांगतात की एकदा फिरत फिरत गोस्वामी चुकून श्वशुरग्रामी श्वशुरगृही येऊन पोहोचले आणि भिक्षा मागितली. पत्नी भिक्षा देण्यास बाहेर आली. तिने त्यांना ओळखले. पण ओळख न देता विचारले, 'आपण काय भोजन बनविणार?' त्यांनी सांगितले, 'मी खिचडी बनविणार आहे.' हे ऐकून तिने चूल मांडून दिली आणि लाकडे, तांदूळ, डाळ, भाजी, तूप वगैरे साहित्य आणून दिले. ते स्मार्त वैष्णव असल्याने हाताने स्वयंपाक करू लागले. ते पाहून तिने विचारले, 'स्वामी, आपल्यासाठी मी मीठमिरची आणून देऊ का?' ते म्हणाले, 'माझ्या झोळीत आहे.' तिने विचारले, 'मसाला वगैरे आणून देऊ का?' उत्तर मिळाले, 'माझ्या झोळीत आहे.' 'मग आपल्याला कापूर वगैरे आणून देऊ का?' तिने विचारले. परत उत्तर मिळाले, 'माझ्या झोळीत आहे.' हे सर्व ऐकून तिने आपली ओळख देऊन विचारले की 'आपण आपल्या झोळीत खरियापासून कापूरापर्यंत सर्व वस्तू बाळगता तर हे प्रिया, आपण आपल्या पत्नीचा त्याग करणे अनुचित आहे. तेव्हा एक तर मला आपल्याजवळ राहू द्या किंवा या झोळीचाही त्याग करून भगवत चरणी अनुराग दृढ करा.' असे म्हणतात की हे ऐकून तुलसीदासांनी झोळीतील सर्व वस्तु ब्राह्मणांना वाटून टाकल्या आणि पत्नीच्या त्या उपदेशामुळे त्यांचे वैराग्य अधिकच प्रबळ होऊन रामप्रेम अधिक दृढतर झाले. दोहावलीत हा दोहा अंतर्भूत केलेला आहे. (दोहा २२५)

## महाकवी नंददास

महाकवी नंददास आणि गोस्वामी तुलसीदास दोघेही चुलतबंधु आणि गुरूबंधुही होते. दोघांना राममंत्र मिळालेला होता. नंददास यांना प्रथम लौकिक विषयात खूप गोडी होती. जेथे कुठे 'भवैया' नाच असेल तेथे जाऊन उभे राहात. तुलसीदासांनी खूप समजाविले की तू असा जेथे तेथे ऐकत बसू नको. पण नंददास ऐकत नसत. यानंतर कांही दिवसांनी एक यात्रेकरूंचा संघ पूर्वेस जाऊन नंतर द्वारकेकडे जाणार असल्याचे ऐकून नंददास यांच्या मनात रणछोडदासजीच्या दर्शनास जावे अशी इच्छा झाली. तुलसीदासांनी त्यास समजाविले की तू जाऊ नको, मार्गात फार दुःख आहे. तू जाशील तर भ्रष्ट होशील; आणि धड रणछोडजीपर्यंत पोहोचणारही नाहीस. तेव्हा रघुनाथाचे स्मरण कर आणि घरी स्वस्थ राहा.' 'तुम्ही कोटी उपाय केले तरी मी राहाणार नाही. एक वेळ तरी श्रीरणछोडदासजींचे दर्शन करून येईन.' असे नंददास यांनी सांगितले. तेव्हा तुलसीदासांनी जाणले की हा राहाणार

नाही. तेव्हा ते स्वत: त्यास यात्रासंघाच्या मुखियाकडे घेऊन आले आणि सांगितले. 'हा नंददास तुमच्याबरोबर येत आहे तेव्हा तुम्ही मार्गात त्याची काळजी घ्या. हा फिरून परत येथे येईल असे करा.' तेव्हा मुखियाने सांगितले की तुम्ही याची काळजी करू नका. यानंतर कांही महिने गेले. नंददास काही परतले नाहीत. तेव्हा मथुरेहून एक यात्रासंघ आला आहे असे कळताच तुलसीदास त्यांच्याकडे जाऊन नंददासाची चौकशी करू लागले. एका वैष्णवाने सांगितले की एक नंददास तर श्रीगोसाईचा सेवक झाला आहे. तो प्रथम अत्यंत विषयी होता, पण आता तर तो मोठा कृपापात्र झाला आहे. तेव्हा हाच आपला नंददास असे जाणून तुलसीदासांनी वैष्णवांना विचारले की मी पत्र देतो ते नंददासाकडे धाडून तुम्ही उत्तर मागवून मला द्याल का? वैष्णव म्हणाले, 'उद्याच माझा मनुष्य गोकुळास जाणार आहे. तर तात्काळ पत्र लिहून द्या.' तेव्हा तुलसीदासांनी तात्काळ पत्र लिहिले आणि त्यात लिहिले की तू पतिव्रता धर्म सोडून व्यभिचार धर्म स्वीकारला आहेस. हे तू चांगले केले नाहीस. आता तू परत आलास तर फिरून तुला पतिव्रता धर्म सांगीन. कासिदाकरवी ते पत्र गोकुळास आले आणि श्रीगोसाईनी वाचून नंददासास दिले. त्यांनी ते वाचून प्रत्युत्तर दिले की 'प्रथम माझा रामचंद्राशी विवाह झाला होता. तेवढ्यात मध्येच श्रीकृष्णाने धावत येऊन मला पळवून नेले. जर रामचंद्रजींच्या ठिकाणी बळ असते तर श्रीकृष्ण मला कसे घेऊन गेले असते? शिवाय रामचंद्र तर एक पत्नीव्रती. तेव्हा ते दुसरीला कसे सांभाळतील? एका पत्नीलाही ते बरोबर सांभाळू शकले नाहीत म्हणून तर रावणाने हरण करून नेले; आणि श्रीकृष्ण तर अनंत अबलांचे स्वामी आहेत आणि त्यांची पत्नी बनल्यानंतर कुठलेच भय उरत नाही. तो एकच सदैव अनेक पत्नींना सुख देत आहे. तेव्हा मी श्रीकृष्ण पती कशासाठी केला हे जाणालच; तेव्हा आता मी तन, मन, धन, इहलोक, परलोक सर्व श्रीकृष्णास दिले आहे. आणि आता तर मी परवश होऊन पडलो आहे!' हे पत्र हस्ते परहस्ते कित्येक दिवसांनी तुलसीदासांना मिळाले; व त्यांनी जाणले की नंददास आता परत इकडे येणार नाही. मग काही वर्षांनी ते स्वत:च व्रजास त्याला भेटण्यासाठी गेले व त्याचवेळी मदनमोहन श्रीकृष्णांनी तुलसीदासांची अनन्यता जाणून त्यांना रामरूपात दर्शन दिले. याप्रमाणे या उभयतांत (नंददास आणि तुलसीदास) जे भ्रातृप्रेम नांदत होते, त्याचेच प्रतिबिंब श्रीरामचरित मानसात पडले असण्याची शक्यता आहे. बालकांडात दोहा २९० मध्ये भरतांना रामचंद्रांची कुशलवार्ता घेऊन दूत आल्याचे कळताच ते धावतच सभेत आले व 'पूछत अति सनेह सकुचाई। तात कहाँ ते पाती आई' कुसल प्रानप्रिय बंधु दोउ अहहिं कहहु केहिं देस।' इत्यादी ओळी वाचल्या की यात्रासंघांना भेटून त्यांच्या कडे नंददासाची चौकशी करणारे तुलसीदास डोळ्यासमोर येतात. विशेष म्हणजे गृहत्याग, पत्नित्याग केल्यानंतरही तुलसीदासांना नंददासाची ओढ वाटून त्यांनी काशीहून व्रजास त्याच्या भेटीसाठी जावे, व तो भेटेपर्यंत एका स्थळाहून दुसऱ्या स्थळी शोध घेत हिंडावे, यावरून त्यांच्या उत्कट स्नेहाची कल्पना येते. तुलसीदासजी वि.सं. १६२६ च्या सुमारास याप्रमाणे एकदा व्रजास गेले व नंतर श्रीरामचरितमानसाच्या निर्मितीनंतर वि.सं. १६३५ च्या सुमारास परत व्रजास गेले. त्यावेळी 'मानसा' वरून स्फूर्ति घेऊन महाकवी नंददास यांनी 'भागवता'चा भाषानुवाद केला आणि त्यांच्या 'रुक्मिणीमंगल' वरून 'पार्वती-

मंगल' आणि 'जानकी-मंगल' ची प्रेरणा तुलसीदासांना मिळाली. तुलसीदासांची पत्नी रत्नावली हिनेही देवर नंददासजी यांचा उल्लेख केलेला असून गोस्वामींनी नंददासद्वारा रत्नावलीस पुढील संदेश धाडल्याचे दोहा रत्नावलीत लिहिले आहे.

'मोहि दीनो संदेस पिय अनुज नन्द के हाथ
रतन समुझि जनि पृथक मोहि जो सुमिरति रघुनाथ ॥'

(दोहा रत्नावली २७)

## तुलसीमित्र टोडर

भदैनी येथे राहाणारे टोडर हे तुलसीदासांचे अनन्य मित्र होते. ते पाच गावचे जमीनदार होते. तुलसीदास प्राकृत जनांचे गुणगान करणे उचित समजत नसत. 'मानसात' 'कीन्हें प्राकृत जन गुन गाना। सिर धुनि गिरा लगत पछिताना' असे त्यांनी स्पष्ट म्हटले आहे. आणि तरीही ज्यावेळी वि.सं. १६६८ मध्ये टोडर यांचा देहांत झाला, त्यावेळी त्यांनी आपला सिद्धांत दूर सारून त्यांच्या मृत्युनंतर चार दोहे त्यांच्या संबंधी लिहिले; त्यावरून त्या उभयतांमध्ये किती अकृत्रिम स्नेहभाव होता याची कल्पना येते.

'चार गांवको ठाकुरो मनको महा महीप।
तुलसी या कलि कालमे, अथए टोडर दीप ॥ १ ॥
तुलसी राम सनेह को, सिर पर भारी भार।
टोडर काँधा ना दियो, सब कहि रहे उतार ॥ २ ॥
तुलसी उर माला विमल, टोडर गुन गन बाग।
ये दोउ नयना सींचिहौ, समुझि समुझि अनुराग ॥ ३ ॥
राम-धाम टोडर गए, तुलसी भए असोच।
जियबे मीतपुनीत बिनु, यही जानि संकोच ॥ ४ ॥

'मानसां'त दिलेली 'सन्मित्र' लक्षणे टोडरमध्ये असावीत. असे म्हणतात की टोडर प्रेमपूर्वक गोस्वामींची सारी व्यवस्था करीत असत. टोडर यांचे वंशज अद्यापही त्यांच्या मृत्युतिथीस ब्राह्मणास शिधा देत असतात. टोडर यांच्या मृत्युनंतर त्यांचे पुत्र आनंदराम आणि पौत्र कन्हई यांच्यामध्ये गृहकलह उत्पन्न झाल्यावर, जी पंचायत भरली आणि वाटण्यासंबंधी जो पंचायतनामा लिहिला गेला, त्यांतील सुरुवातीचा मजकूर तुलसीदासांच्या हस्ताक्षरांतील प्रामाणिक लेख, आजही काशीनरेशांजवळ सुरक्षित आहे. (वि.सं. १६६९) त्याचा काल आश्विन शुद्ध १३.



॥९॥

# तुलसीदासांचे व्यक्तिमत्त्व

**वर्णाकृती :** 'जननि जनक तज्यो जनमि, करम बिनु बिधि सृज्यो अबडेरे' या उल्लेखावरून कुणी गोस्वामींना कुरूप, बेडौल ठरवितात. पण त्यांनी केलेल्या 'दियो सुकुल जन्म शरीर सुंदर, हेतु जो फल चारि को' (वि.प. १३५)' हौ सुवरनं कुवरन कियो' (वि.प. २६६ इत्यादी उल्लेखावरून, तसेच 'रत्नावली चरित' 'प्रेम रामायण,' 'तुलसी प्रकाश' 'गौतमचंद्रिका' इत्यादी ग्रंथावरून, तसेच त्यांच्या छायाचित्रावरून ते गौर वर्णाचे, सुंदरशरीराचे होते असे दिसून येते. ते आजानुबाहु होते असेही वर्णन आहे.

**मातृ-पितृ-गुरुभक्ती :** त्यांचे मातापिता बालपणीच परलोकवासी झालेले होते. याची खंत वृद्धावस्थेपर्यंत कायम होती. विनयपत्रिकेत 'मातु-पिता-गुरु, गनपति, सारद। सिवा समेत संभु, सुक नारद ॥ ३ ॥ चरन बंदि बिनवौ सब काहू। देहु रामपदनेह निबाहू ॥ ४ ॥ (पद ३६) याप्रमाणे हनुमंतानंतर गुरू, गनपति इत्यादींच्या आधी मातापित्यांना वंदन केले आहे. तसेच त्यांच्या साहित्यात जो मातृ- पितृ भक्तीचा गौरव आढळतो, त्यावरूनही त्यांच्या भावनांची कल्पना येते; त्यांचा दृष्टिकोन कळून येतो. त्यांनी गुरूंच्या नावाचा उल्लेख अप्रत्यक्षरीत्याच केला असला व त्यांचे गुरू कोण, नृसिंह चौधरी किंवा 'रसिक प्रकाश भक्त माल छप्पय २१' यांतील उल्लेखाप्रमाणे रामानंद - सुरसुरानंद गोपालदास, रघुनाथदास, नरहरिदास आणि गो. तुलसीदास अशा प्रमाणे रामानंद संप्रदायांतील नरहरिदास, हे निश्चित नसले तरी त्यांच्या गुरूभक्तीविषयी कुणालाही शंका नाही. 'मानसातील' 'गुरुवंदना' वरून याची कल्पना येते.

**रामदास्य :** बालपणापासूनच त्यांनी रामदास्य स्वीकारले होते. त्यातील त्यांची उत्कटता, भव्यता, दिव्यता आणि अनन्यता लोकविलक्षण असून, त्या भावनेवरच त्यांचे संपूर्ण जीवन अवलंबून होते. तो त्यांचा जीवनाधार होता हे त्यांच्या साहित्यावरून स्पष्ट जाणवते. 'सेवक सेव्य' भावाशिवाय भवसागरांतून पार होता येणारच नाही हा त्यांचा सिद्धांत आहे.

**रामनामप्रेम :** त्यांच्या ठिकाणी पराकोटीचे असून रामापेक्षा त्यांची नामावर अधिक निष्ठा, अधिक भरवंसा आहे. श्रीरामाचे नाम हा अंक आहे, इतर साधने शून्य आहेत. अंक नसेल तर काहीच हाती लागत नाही. परंतु शून्यापूर्वी अंक असेल तर त्याची किंमत दसपट वाढते असे ते म्हणतात. 'अलख' 'अलख' म्हणून ओरडणाऱ्या साधूची कानउघाडणी करून त्यांनी त्यास प्रथम रामनामाचा जप करण्याचाच सल्ला दिला. रामाच्या आधाराशिवाय परमार्थप्राप्तीची इच्छा करणे व्यर्थ आहे असे त्यांनी सर्वत्र म्हटले असून 'तुलसी! ज्याचे मुखांतुनी, चुकुनिही निघते 'राम' । वहाण त्याचे पायिची, माझ्या तनुचे चाम। (अनुवाद पू. प्रज्ञानानंद सरस्वती) या शब्दातून त्यांची नामनिष्ठा व्यक्त झाली आहे. किती उदाहरणे द्यावीत?

**रामप्रेम :** तुलसीदासांचे संपूर्ण जीवनच रामप्रेममय असल्याने त्याविषयी लिहावे तेवढे

थोडेच आहे. सर्व साधने ही फुले असून रामप्रेम हरिपदरति हा त्यांतील रस मकरंद आहे. रामप्रेमाशिवाय सर्व व्यर्थ असून ज्यांच्या हृदयात रामप्रेम नाही त्यांच्याबाबत विधाता प्रतिकूल आहे असेच समजावे. त्यांचे जीवित व्यर्थ होय. सर्व इंद्रियांची सार्थकता रामपर होण्यातच आहे. 'राम सनेही राम गति राम चरण रति जाहि। तुलसी फल जग जनमको दियो विधाता ताहि' (दोहा ५८) जे लोक विषयांसंबंधी विरक्त असून रामाच्या ठिकाणी अनुरक्त असतात ते रामचंद्रास प्रिय असतात. मग ते घरात वा वनात कुठेही राहात असोत! ही रामभक्ति कशी असावी तर चातकासारखी! (चातकांच्या एकांगी अनन्य प्रेमाचे वर्णन करणारे जवळ जवळ ३५ दोहे दोहावलींत आहेत). त्या प्रेमात सहजता, अकृत्रिमता हवी! दंभ नसावा. रामरूपाचे वर्णन, व त्यांच्या शरणागत वत्सलतेचे, पतित पावन ब्रीदाचे वर्णन यांनी तुलसीसाहित्य ओतप्रोत भरलेले आहे. सहज नजर टाकली तरी याचा प्रत्यय येतो. असे सांगतात की तीर्थयात्रा करीत असता, 'रामपुर, रामघाट' इत्यादि सारखी नावे कानांवर पडली तरी तुलसीदास रामप्रेमात बुडून जात. प्रेमाश्रूनी नेत्र भरून येत. कंठ रूद्ध होई. तात्काळ साष्टांग दंडवत प्रणाम केला जाई. एका व्रजयात्रेच्या वेळी म्हणे, श्रीगोसाई विठ्ठलदास यांचे पुत्र रघुनाथ यांचा विवाह होता; व सर्वत्र त्यानिमित्त धामधूम चाललेली होती. तुलसीदासांनी विचारले. 'कसली धामधूम चालली आहे?' उत्तर मिळाले, 'रघुनाथ विवाहाची!' त्यांनी विचारले, 'कुणाशी विवाह आहे?' उत्तर मिळाले, 'जानकीशी' आणि हे ऐकताच तुलसीदास इतके प्रेमविव्हल झाले की काही विचारू नका! लोकांनी त्यांना धरून गोसाई विठ्ठलनाथ यांच्याकडे नेले. आणि असे सांगतात की वधू वरांच्या ठिकाणी त्यांना खरोखरच रामजानकीचे दर्शन झाले! 'सीताराम' मय सर्व जग पहाण्याएवढी व्यापकता, सखोलता त्यांच्या रामप्रेमात होती.

'राम ते अधिक राम कर दासा' ही त्यांची भावना असल्याने रामप्रभूपेक्षा उत्कट प्रेम हनुमंताविषयी असल्याचे दिसून येते. हनुमंत स्तुति सर्व काव्यात तर आहेच, शिवाय 'हनुमान चालिसा', हनुमान बाहुक इत्यादी सारखी स्वतंत्र रचनाही आहे.

**शिवभक्ती :** साधारणतः असे दिसून येते की वैष्णव हे केवळ विष्णुचीच भक्ती करतात, आणि शैव केवळ शिवाची. पण तुलसीदासांच्या ठिकाणी दोन्हीचा समन्वय साधला गेला असून उत्कटताही कायम आहे. शिवाच्या स्तुतीपर अनेक पदे त्यांनी रचिली असून त्यांनी शिवपार्वती प्रेमामुळे कायम काशीवास पत्करला होता. काशीत त्यांचा अनेक प्रकारे छळ झाला, पण काशी त्यांनी अखेरपर्यंत सोडली नाही. 'गुरू, पितु, मातु महेस भवानी' असे 'मानसात' त्यांनी म्हटले आहेच.

**सुरसरिप्रेम :** रामभक्त असूनही शरयूपेक्षाही त्यांच्या काव्यात गंगाप्रेम अधिक व्यक्त झाले आहे. गंगेची स्तुति करणारी पदेही आहेत. आणि वारंवार आपण जन्मास यावे आणि गंगातीरी वास करावा आणि रामभक्तच व्हावे अशी इच्छा त्यांनी व्यक्त केली आहे! काशीवासाचे हेही एक कारण आहे!

**सत्संगाची आवड :** संतांचा महिमा तुलसीदासांनी सर्वत्र वर्णिला असून जगात सत्संगासारखे महान सुख दुसरे नाही असे म्हटले आहे. सत्संगति दुर्लभ संसारा। निमिषभर

घडीभर एकहि बारा' असे असल्याने तिचे फार महत्त्व आहे. संत सर्व जगात सर्वत्र सदैव वावरत असतातच पण आपल्याला त्यांची संगति मात्र रामकृपेशिवाय प्राप्त होत नाही. नुसता दर्शनाचा लाभ घडणे आणि संगति घडणे यात फरक आहे. 'रामभक्ती' संतकृपेशिवाय मिळत नाही. संतकृपेने काक, पिक होतात, बगळे हंस होतात. कुणालाही जो चांगुलपणा मिळतो त्यामागे सत्संगति हे मूळ कारण असते. संताजवळ गेल्यानेच हरिकथामृत प्राप्त होते.

**दैन्यभाव :** 'विनयपत्रिका' ह्या ग्रंथात ह्याच भावनेचा परिपोष सर्वाधिक झाल्याचे दिसून येते. जो स्वतःस मोठा, शहाणा समजतो तो खरोखरी निकृष्ट असतो. खरा भक्त स्वतःस कधी श्रेष्ठ समजत नाही; तो आपणास दीन, हीन, मलीन असेच खरोखर मानीत असतो. 'मजसम दीन न दीनहित तुम समान रघुवीर' यासारखी वचने सर्वत्र विखुरली आहेत. 'मानद सकला स्वयें अमानी' हे तर रामभक्ताचे प्रमुख लक्षण आहे. यामुळे अत्यंत निरभिमानवृत्ती तुलसीदासांच्या ठिकाणी दिसून येते. अहंकार जरासाही नाही.

**नीतिविषयी कटाक्ष :** 'विघ्नकोटिने संत मन नीति सोडिल काय?' 'प्रीति राम सो नीतिपथ, चलिये राग रीस जीति, तुलसी संतनके मते इहे भगतिकी रीति' यासारख्या वचनावरून तुलसीदास नीतीस किती महत्त्व देत होते हे कळून येते.

**पांडित्य असून लीनता :** तुलसीदास महान पंडित होते हे त्यांच्या 'नानापुराणनिगमागम संमतं यद्' अशा 'श्रीरामचरित मानस' ह्या एकाच ग्रंथावरून कळून येते. ते बहुभाषिक, बहुश्रुत असूनही विनम्रतेची पराकाष्ठा त्यांच्या ठिकाणी दिसून येते. 'मो सम दीन न दीन हित तुम्ह समान रघुवीर' अशा आशयाचे उद्‌गार सर्वत्र आहेत.

**लोकभाषेचा आदर :** 'का भाषा का संस्कृत प्रेम चाहिए साँच। काम जु आवै कामरी का लै करिअ कुमाच?' हरिहर जस सुर नर गिरहुँ बरनहिं सुकबि समाज। हाँडी हाटक घटित चरु राँधे स्वाद सुनाज' इत्यादि वचने तसेच 'स्याम सुरभि पयबिसद अति गुनद करहिं सब पान' यावरून त्यांनी संस्कृत भाषाभिमानी पंडितांना कसे चोख उत्तर दिले याची कल्पना येते. ज्ञानेश्वर, एकनाथ महाराज यांच्याप्रमाणेच प्राकृत भाषेत ग्रंथनिर्मिती केल्यामुळे गोस्वामींनाही विरोधास तोंड द्यावे लागले, व आपल्या कृतीचे समर्थनही करावे लागले.

**दयालु आणि परोपकारी स्वभाव :** गोस्वामी तुलसीदास स्वभावतःच अत्यंत दयाळु आणि परोपकारी होते. त्यातच बालपणी त्यांना दारिद्र्याचे चटके बसून अतिशय कष्ट सोसावे लागले त्यामुळे परदुःखाविषयी सहानुभूती त्यांच्या अंतःकरणात होती. ते विरागी होते व स्वतःचा संसार त्यांनी सोडला तरी दुसऱ्याचे दुःख पाहून त्यांचे हृदय द्रवून ते हस्ते परहस्ते, त्यांचे दुःख दूर करण्याचा प्रयत्न करीत. काशीतील लोकांनी त्यांना भरपूर त्रास दिला. पण ज्यावेळी काशीत महामारीचा प्रकोप होऊन लोक भराभर मृत्युमुखी पडू लागले; त्यावेळी त्यांचे दुःख तुलसीदासांना पहावेना आणि त्यांनी शंकरांना, रामप्रभूंना महामारी शांत व्हावी म्हणून प्रार्थना केली. 'रामाज्ञा-प्रश्न' 'राम-शलाका प्रश्नावली' वगैरे ग्रंथ लोकोपयोगासाठीच निर्माण झाले. पुढील काव्यावरून त्यांच्या स्वभावाची कल्पना येते.

'हित सों 'हित रति राम सों, रिपु सों बैर बिहाउ
उदासिन सब सौ सरल, तुलसी सहज सुभाउ॥ दोहावली ९३
'परहित-निरत निरंतर, मनक्रम बचन नेम निबहोंगे'

श्री रघुनाथच्या कृपेने कधी आपला स्वभाव संतासारखा बनेल का? असे म्हणून अशी इच्छा प्रकट केली.

**मृदु, भावनाप्रधान स्वभाव :** गोस्वामी तुलसीदास हे अत्यंत भावनाप्रधान होते असे त्यांच्या चरित्रावरून आणि साहित्यावरून दिसून येते. मातापिता यांच्या वियोगाची खंत त्यांच्या वृद्धावस्थेत निर्माण झालेल्या साहित्यात दिसून येते. पत्नीवरही त्यांनी काही वर्षे जे प्रेम केले तेही अति उत्कट असे केले. एकदा तो मोह दूर सारल्यावर मात्र त्यांनी एकदा जे आपले जीवित रामचरणी समर्पित केले ते अखेरपर्यंत. श्रीरामचरितमानसांतही 'सीतात्याग' हा कथाभाग त्यांच्या मृदुल स्वभावामुळेच त्यांनी केवळ सूचित केला असून सविस्तर वर्णन टाळले आहे. तसेच लक्ष्मणाने दशरथ महाराजांबद्दल जे कठोर, कटु शब्द उच्चारले, तसेच कांचनमृग प्रसंगाच्या वेळी सीता लक्ष्मणास जे काही बोलली त्यासंबंधी केवळ उल्लेख करून त्यांनी पुढील कथाभाग सांगितला आहे. ('मरम वचन जब सीता बोला। हरि प्रेरित लछिमन मन डोला॥' एवढ्यावरच भागविले आहे.)

**मर्यादापालन :** मर्यादापुरुषोत्तम रामचंद्राचे भक्त हे त्यांच्या प्रमाणेच मर्यादापालनाविषयी अतिदक्ष होते असे आपणास दिसून येते. त्यांच्या साहित्यातील रूपवर्णने पाहिली तर ती सहज सुंदर असूनही अश्लीलतेपासून सर्वथा दूर असल्याचे जाणवते. स्त्रियांच्या अवयवाचे वर्णन त्यांनी कुठेही केलेले नाही. तसेच त्यांची शृंगारवर्णने ही बहारदार असूनही त्यांत कुठेही मर्यादा अतिक्रमण झालेले नाही. लोकमर्यादा आणि धर्ममर्यादा दोन्हीचे रक्षण त्यांनी उत्तमप्रकारे केल्याचे आढळून येते. त्यांनी रंगवलेली व्यक्तिचित्रेही कधी लक्ष्मणरेषा ओलांडताना आढळत नाहीत.

**विशाल दृष्टिकोन :** तुलसीदास हे वर्णाश्रमधर्माचे अभिमानी होते व त्यावर त्यांची निष्ठाही होती. पण त्यांच्या साहित्यात भिन्न भिन्न वर्णाच्या, आश्रमाच्या व्यक्तींचे परस्परांतील संबंध हे अतिसलोख्याचे, स्नेहपूर्ण असल्याचे दिसून येते. निषादराज, केवट, मार्गातील नरनारी, कोळी, भिल्ल, वानर, राक्षस कुणीही असो त्याला तुलसीदासांचा राम अत्यंत सन्मानाची वागणूक देताना आढळतो. त्यांच्यातील अकृत्रिम स्नेहाचे जे वर्णन तुलसीदासांनी केले आहे ते खरोखर अत्यंत हृदयस्पर्शी झाले आहे. लक्ष्मण, भरत यांच्याप्रमाणेच त्यांना आलिंगन देऊन प्रभूंनी त्यांची प्रेमाने विचारपूस केली आहे. असे म्हणतात की, तुलसीदासांचे स्नेहीही, सर्व जातीत आणि वर्णात होते. गंगाराम ज्योतिषी, टोडर, राजा मानसिंग, अब्दुल रहीम, खानखाना, मेधा भगत इत्यादि चार पाच नावे लक्षात घेतली तरी या गोष्टीची सत्यता जाणवते. तसेच काशीतील पंडितांनी त्यांना जातिबहिष्कृत करण्याचे ठरविले तेव्हा कुणी काही अफवा उठविल्या, तेव्हा 'मेरे जाति पाँति न चहौं काहू की जाति पाँति।' कवितावली (उत्तरकांड १०७) 'मेरे ब्याह न बरेखी, जाति पाँति न चहत हौ।' 'अति ही अयाने उपखानो

नहि बूझै लोग,' 'साह दी को गोतु गोतु होत है गुलामको।' (कवितावली उत्तरकांड १०७) इत्यादि उद्‌गार त्यांनी काढले आहेत. यावरून त्यांच्या उदात्त आणि विशाल दृष्टिकोनाची कल्पना येते.

**प्रतिभासंपन्नता :** तुलसीदासांची योग्यता संत म्हणून, भक्त म्हणून श्रेष्ठ दर्जाची होतीच, पण त्यांना जी आंतरराष्ट्रीय कीर्ती आणि आदर प्राप्त झाला आहे, त्यास त्यांची महान साहित्यनिर्मिती, विशेषतः त्यांचा 'श्रीरामचरित मानस' हा ग्रंथ कारणीभूत आहे. त्यांच्या नावावर एकूण चौपन्न ग्रंथ गणले जातात. काशीच्या नागरी प्रचारिणी सभेच्या शोधकार्याच्या अहवालानुसार ३७ कृतींची नावे मिळतात, पण तेरा ग्रंथ प्रामाणिक मानले जातात. त्यांचे वैशिष्ट्य असे की त्याकाळी प्रचलित अशा सर्व शैलीत त्यांनी काव्यरचना केलेली आढळते.

१) सूफींची दोहा चौपाई पद्धती. यात श्रीरामचरितमानसाची रचना केली आहे.

२) विद्यापती आणि सूरदास यांची गीत पद्धती. यात विनयपत्रिका, गीतावली, कृष्णगीतावली.

३) गंग आदि चारण कवींची कवित्त-सवैया पद्धती. यात कवितावली.

४) तद्देशीय सोहर लोकगीते-रामलला नहछू.

५) सोरण दोहा पद्धती-यात दोहावली, आणि

६) रहीम यांची बरवै पद्धती. यात बरवै रामायण, याशिवाय

७) संस्कृत छंदातील रचना मुबलक आहेतच. अवधी आणि व्रजी या दोन्ही भाषेत रचना असून बहुभाषिकत्वामुळे अरबी, फारसी उर्दू, मराठी, गुजराती, हिंदी, संस्कृत वगैरे अनेक भाषांतील शब्दभांडार वापरले आहेच. त्यांच्या प्रतिभेला कुठल्याही विषयाचे वावडे नाही. आध्यात्मिक, धार्मिक, राजनैतिक, सामाजिक, पारिवारिक, आचारविचार संबंधी, तसेच भाषिक यापैकी एकही क्षेत्र त्यांनी अस्पर्श असे सोडलेले नाही; एवढेच नव्हे तर सर्व क्षेत्रात आपला महत्त्वपूर्ण ठसा उमटविला आहे.

**दृढनिश्चय :** 'निश्चयाचे बळ, तुका म्हणे तेचि फळ' दृढनिश्चयाच्या बळावरच तुलसीदासांनी आपले ध्येय साध्य करून घेतले. त्यांच्या जीवननिष्ठा त्यांनी निश्चयपूर्वक जपल्या. एकदा पत्नीचा आणि गृहाचा त्याग केल्यावर परत ते तिकडे वळले नाहीत. त्यांचे संपूर्ण जीवनच संघर्षमय असून त्यांना सतत आपल्या ध्येयासाठी झगडावे लागले. पण अनंत अडचणींना त्यांनी दृढनिश्चयाने तोंड देऊन ते त्यावर मात करण्यात यशस्वी ठरले.

**आत्मविश्वास :** गोस्वामींच्या चरित्रांतून आणि साहित्यांतून एकाच वेळी आत्यंतिक दैन्यभावाचे आणि जबर आत्मविश्वासाचे दर्शन घडते. रामप्रभूंच्या पुढे विनयपत्रिका सादर करताना विनम्रतेची पराकाष्ठा झाली आहे. तर स्वतःच्या कृतींच्या यशासंबंधी विश्वासही ठायीठायी व्यक्त झालेला दिसतो श्रीगुरूपदरजाने निजमन-मुकुर स्वच्छ करून त्यांनी जे रामचरित सांगण्यास आरंभ केला, ते भवमोचन करणारे आहे. तसेच हे चरित्र जे कोणी सावधपणे समजून ऐकतील व गातील ते रामचरणअनुरागी, कलिमलरहित आणि

सुमंगलभागी होतील याची खात्री त्यांना आहे. समजा खलांनी परिहास, कुचेष्टा केली तरी 'खल परिहास होइ हित मोरा। काक कहहिं कलकंठ कठोरा॥ हंसहि बक गादुर चातकही। हँसहि मलिन खल विमल बतकही।' (श्रीरामचरित मानस बालकांड दोहा ९) असे ते म्हणतात, तेव्हा त्यांचा आत्मविश्वासच प्रगट होत नाही का?

**थोर तत्त्वज्ञ :** तुलसीदास यांना सांप्रदायिक दृष्ट्या, अनेक विद्वान् विशिष्टाद्वैती मानत असले तरी त्यांच्या ग्रंथाचा सूक्ष्म अभ्यास केला तर त्यांची मते आणि अनुभव केवलाद्वैत सिद्धांतास अनुसरून असल्याचे दिसून येते. 'ब्रह्म सत्य, जगत् मिथ्या. जीव हा ब्रह्मच आहे अन्य नव्हे हाच सिद्धांत त्यात आढळतो. महाराष्ट्रातील ज्ञानेश्वर ते तुकाराम, तसेच रामदास इत्यादी संतांची मते आणि तुलसीदासांची मते यात पूर्ण एकवाक्यता आढळते. अगदी 'मानसा'तील मंगलाचरणातील 'यन्मायावशवर्ति विश्वमखिलं ब्रह्मादिदेवासुरा। यत्सत्त्वादमृषैव भाति सकलं रज्जौ यथाहेर्भ्रमः।' या वचनापासून 'रजत सीप महु भास जिमि जथा भानु कर बारि। जदपि मृषा तिहुँ काल सोई भ्रम न सकइ कोउ टारि॥' 'जड चेतनहि ग्रंथि परि गई। जदपि मृषा छूटत कठिनाई॥' (उत्तरकांड ११७) पर्यंत अनेक वचने याविषयीची खात्री देतील. मात्र तुकाराम महाराजांच्याप्रमाणेच भक्तीकडे ओढा अधिक असल्याने तुकाराम महाराजांनी जशी 'नको ब्रह्मज्ञान आत्मस्थितिभाव, मी भक्त तू देव ऐसे करी' अशी मागणी केली आहे, तशी तुलसीदासांनी अनेक ठिकाणी, वारंवार जन्माला येऊन रामभक्त व्हावे अशी इच्छा प्रगट केली आहे. 'सेवक सेव्य भाव बिनु भव न तरिअ उरगारि। भजहु राम पद पंकज अस सिद्धान्त बिचारिं॥ (उत्तरकांड ११९ क) 'जीव कि ईस समान॥' (बालकांड ६९) 'सुरसरि जल कृत बारुनि जाना। कबहुँ न संत करहिं तेहि पाना। सुरसरि मिलें सो पावन जैसे। ईस अनीसहि अंतरू तैसे॥' अशा वचनांवरूनही ते विशिष्टाद्वैती होते असे काही विद्वान् मानतात. पण सगुणोपासनेचा त्याकाळी लोप झाला होता; आणि लोक एकंदर जीवनासंबंधी उदासीन बनले होते. त्यामुळे त्यांच्या ठिकाणी जीवनासंबंधी अदम्य उत्साह निर्माण करण्यासाठी त्यांना सगुणसाकार रूपाकडे वळवून, श्री प्रभूरामचंद्रांचा आदर्श त्यांच्यापुढे ठेवणे हे अत्यंत आवश्यक होते. त्यामुळेच स्वतः केवलाद्वैती असूनही तुलसीदासांनी द्वैताचे समर्थन केल्याचे आढळते. तुलसीदासांचे वैशिष्ट्य हेच आहे की सांप्रदायिक, अतिरेकाचा स्पर्श होऊ न देता त्यांनी विविध मतप्रणालींचा भगवत् गीतेप्रमाणेच समन्वय साधला आहे.

**आदर्श शिक्षक :** एकनाथ महाराजाप्रमाणेच तुलसीदास हे आदर्श शिक्षक आहेत. आपले म्हणणे पटवून देण्यासाठी ते व्यवहारातील अनेक दाखले, उदाहरणे देऊन लोकांना विषय समजावून देतात. मग ते अध्यात्म असो वा राजकारण! तुकाराम महाराजांचे अभंग जसे खरोखर 'अभंग' ठरले असून सर्व लहानथोरांच्या तोंडी त्यातील वचने रूळलेली आढळतात. तसेच तुळसीदासांच्या 'मानसा'तील सुभाषिते हिंदी भाषिकातील आबालवृद्धांच्या मुखातून सहज बाहेर पडत असतात. त्यांचा संस्कार सहज त्यांच्या चित्तावर होत रहातो. कित्येकांच्या जीवनास सुयोग्य दिशा लावण्याचे कार्य आजतागायत अव्याहतपणे होत आले आहे.

आयुष्यातील खडतर प्रसंगी अचूक मार्गदर्शन करण्याचे त्यांच्या वाणीचे सामर्थ्य आजही प्रत्ययास येते. यातच त्यांच्या थोरवीचे रहस्य आहे.

**समर्थ समाजसुधारक :** शुद्ध चारित्र्य आणि अनुभवाची समृद्धता असेल तर त्या व्यक्तीच्या वागण्याबोलण्याचा प्रभाव सहजच इतरांवर पडतो. समर्थांप्रमाणे 'आधी केले मग सांगितले' असेच तुलसीदासांचे वर्तन होते. तत्कालीन समाजात शैव, वैष्णव, सगुण, निर्गुण, सांप्रदायिकतेचा अभिमान, आपापल्यावर्णाचा अभिमान, इत्यादी अनेक कारणांनी समाज विभक्त झाला होता. तुलसीदासांनी या सर्व गोष्टी विचारात घेऊन दूरदृष्टीने या सर्वांचा समन्वय साधून, सर्वांचे समाधान करून सर्व समाजाचे हित साधणारे विचार आपल्या ग्रंथांतून लोकांपुढे मांडले; तेही लोकभाषेच्या माध्यमांतून! त्यांतही आपल्या निर्मल आणि प्रखर प्रज्ञेने त्यांना असे आकर्षक रूप दिले की कुणीही कुठल्याही दृष्टीकोनातून त्याकडे पाहिले तरी त्यास त्यात गोडी वाटून आपले श्रेयस प्राप्त व्हावे.

## आक्षेप निरसन

तुलसीदासांवर एक असा आक्षेप घेतला जातो की स्त्रियांसंबंधी त्यांचा दृष्टिकोन तितकासा उदार नव्हता. पण त्यांनी केलेले कौसल्या, सुमित्रा, सीता, शबरी इत्यादींचे चित्रण पाहिले की हा आक्षेप तितकासा बरोबर वाटत नाही. क्वचित काही वाक्ये स्त्रियांची निंदा करणारी आली आहेत पण ती रामचरितात विशिष्ट प्रसंगी त्या त्या व्यक्तींच्या भावना, विचार व्यक्त करणारी आहेत. त्यामुळे याबद्दल तुलसीदासांना दोषी ठरविता येणार नाही. सतीच्या चालीबद्दल त्यांचे काय विचार होते हे पुढील दोह्यांवरून लक्षात येईल.'परमारथ पहिचानि मति लसति विषयँ लपटानि। निकसि चिता ते अधजरति मानहुँ सती परानि ॥ २५३ ॥ 'सीस उधारन किन कहेउ बरजि रहे प्रिय लोग। घरहिं सती कहावती जरती नाह बियोग ॥ २५४ ॥ 'दोहावलीतील दोहा २६८ यात 'जनमपत्रिका बरति कै देखहु मनहिं बिचारि। दारून बैरी मीचु के बीच विराजति नारि'। यांत तुलसीदासांचे स्वतःचे मत व्यक्त झाले आहे हे जरी खरे तरी 'वैद्यराज नमस्तुभ्यं यमराज सहोदर' या वचनावरून जसे वैद्यांबद्दल अनुदार मते आहेत असे ठरविणे योग्य नाही तसेच तुलसीदासांवर अनुदारतेचा आक्षेप घेणे योग्य नाही असे वाटते.

## परमादर स्थाने

भरतखंड, अयोध्या, चित्रकूट, काशी याविषयींचे प्रेम त्यांच्या साहित्यातील वर्णनावरून दिसून येते. भलि भारतभूमि, भले कुल जन्मु (कविता. उत्तरकांड ३३) 'यह भरतखंड समीप सुरसरि थल भली संगति भली' (विनयपत्रिका १३५) 'सेइअ सहित सनेह देह भरी, कामधेनु कलि कासी' (वि. प. २२) 'सब सोच विमोचन चित्रकूट। कलिहरन, करन कल्यान बूट' (वि.प.२३) 'अब चित चेति चित्रकूटही चलु' (वि.प.२४) 'बँदऊँ अवध पुरी अति पावनी' (रामचरित मानस बा. कांड १६). वराह अवताराचा उल्लेख दोनदा मिळतो. एकदा रामायणात अयोध्याकांड दोहा २९७ मध्ये व दुसरा गीतावलीतील चित्रकूट वर्णनात. (गीतावली अयोध्याकांड पद ५०) 'सिरवर परसि घन घटही मिलत बगपांती सो छवि कवि

बरनी। आदि बराह बिहारी बारिधि मानो उठो है दसन धरी धरनी।' 'सोक कनकलोचन मति छोनी। हरी विमल गुन गन जग-जोनी। भरत बिवेक बराहँ बिसाला। अनायास उधरी तेहि काला' (मानस).

सूकरखेतमध्ये बालपण गेल्याने या उपमा सुचल्या असतील का?

**दंभ, कपट इत्यादीचा तिटकारा :** सर्व संतांप्रमाणे तुलसीदासांनाही दंभ, कपट यांचा तिटकारा होता. त्यांच्या साहित्यात त्यांनी दंभी कपटी लोकांवर कडक टीका केली आहे. काही ठिकाणी विनोदाचा आश्रय घेऊन उपरोधाने त्यांचे वर्णन केले आहे. मानसात बालकांडातील 'बहुरि बंदी खल गन सतिभाएँ। जे बिनु काज दाहिनेहु बाएँ।' दोहा ४ संपूर्ण यातील वर्णन वाचण्यासारखे आहे.

तुलसी जे कीरति चहहिं पर की किरति खोइ। तिनके मूह मसि लागि है मिटिही न मरिहै धोई। दोहावली ३८९

('रामचरितमानस उत्तरकांड')

मिथ्यारंभ दंभरत जोई। ता कहुँ कहइ संत सब कोई। ४ दोहा ९८.

सोइ सयान जो परधन हारी। जो कर दंभ सो बड आचारी ॥ ५

जो कह झूठ मसखरी जाना। कलिजुग सोइ गुनवंत बरवाना ॥ ६

अशुभ वेष भूषन धरें भच्छाभच्छ जे खाहि। तेइ जोगी तेइ सिद्ध नर पूज्य ते कलिजुग माहिं ।९८ क

जे अपकारी चार तिन्ह कर गौरव मान्य तेइ। मन क्रम बचन लबार तेइ बकता कलिकाल महुँ।९८ख

सर्वच वर्णन पहाण्यासारखे आहे.

**सर्वाभूतीं भगवद्‌भाव :** सीताराममय सर्व जग जाणून 'मानसांत' प्रथमच तुलसीदासांनी सर्वांना वंदन केले आहे. अनन्य भक्त कोणास म्हणावे हे सांगताना किष्किंधाकांडात प्रभु म्हणतात, 'सो अनन्य जाके असि मति न टरइ हनुमंत। मै सेवक सचराचर रूप स्वामि भगवंत ॥ ३ ॥' याप्रमाणे सर्वाभूतीं भगवद्‌भाव पहाणे हेच खरे भजन असे जरी तुलसीदासांचे मत असले आणि तसेच वर्तनही असले तरी एकनाथ महाराज आणि समर्थ रामदास यांच्याप्रमाणे व्यवहारात मात्र सज्जन, दुर्जन अशी जशी व्यक्ती असेल त्याप्रमाणे त्या त्या व्यक्तीशी भिन्नप्रकारे वागावे लागते व तसेच वागणे योग्य आहे हे, त्यांनी जी व्यक्तिचित्रे रंगवली आहेत व त्याचे परस्परांशी जे वागणे दाखवले आहे, त्यावरून दिसून येते. उदा. भरत-कैकयी, रावण- बिभीषण इत्यादी किती उदाहरणे देणार?

'सठ सन बिनय कुटिल सन प्रीति । सहज कृपन सन सुंदर नीती। ममता रत सन ग्यान कहानी। अति लोभी सन बिरति बरवानी। क्रोधिही सम कामिही हरिकथा। ऊसर बीज बँए फल जथा। (कि.कांड ५८).

'कदलीला कोटी यत्न करून शिंपले, तरी ती तोडल्यानंतरच फळते, त्याप्रमाणेच नीच हा विनंति करून मानत नाही; त्याला दरडावले म्हणजेच तो नमतो.' (दो.५८) तसेच रामदासांप्रमाणे ते प्रयत्नवादी होते हे लक्ष्मणाच्या तोंडी त्यांनी 'नाथ दैव कर कवन भरोसा। दैव दैव आलसी पुकारा।' अशी जी वचने घातली आहेत त्यावरून दिसून येते.

**निर्भयता :** अनेक संकटे आली तरी ते डगमगले नाहीत. तत्कालीन काही इतर कवीप्रमाणे त्यांनी अकबर, जहांगीर किंवा इतर सत्ताधारी यांचेपुढे लांगूलचालनही केले नाही किंवा वेळप्रसंगी त्यांच्यावर कडक टीका करण्यासही मागेपुढे पाहिले नाही. 'रघुवीराच्या बाहुबलाने ह्या तुलसीदासास कुणाचेही भय नाही. तो सदा अभय आहे' असे उद्‍गार त्यांनी काढले आहेत. यावरून विद्वान् न विभेति कदाचन ह्या तैत्तरीय उपनिषदातील वाक्याची आठवण येते.



॥१०॥

# तुलसीदासांची असामान्यता

कर्म, ज्ञान, उपासना ही लोकधर्माची तीन प्रमुख अंगे समाजात प्रतिष्ठित झालेली आहेत. मानवी जीवनात तिन्हींचा मेळ हवा. एकाच अंगाचे महत्त्व वाढले की समतोल प्रस्थापित करण्यासाठी एखादा महात्मा अवतरतो. कर्मकांडाची प्रबलता वाढली तेव्हा याज्ञवल्क्य अवतरले. त्यांनी ज्ञानकांडाकडे लोकांचे लक्ष वेधून घेतले. कांही काळाने परत कर्मकांड प्रबल झाले. यज्ञात अतिशय पशुहिंसा होऊ लागली तेव्हां भगवानबुद्धांनी कर्मकांडापासून लोकांना परावृत्त करून अहिंसा, ज्ञान, वैराग्यमिश्रित संन्यास धर्माकडे आकृष्ट केले. पण देशावर परकीयांचे अमानुष हल्ले होऊ लागले, तेव्हा अहिंसेवर अधिष्ठित राजसत्ता त्यांचा समर्थ प्रतिकार करण्यास अक्षम ठरली आणि परत वैदिक हिंदुधर्माकडे समाज आकृष्ट झाला. धर्म आणि राजनीतिमध्ये नेहेमीच अशी उलथापालथ चक्रगतीने चाललेली दिसते आणि समाजाच्या जिवंतपणाचे ती प्रतिक असल्याने ती आवश्यकही आहे. धर्माच्या ह्या विविध अंगांचे सामंजस्य पूर्ण रूपाने जर प्रतिष्ठित झाले तर लोक त्याकडे सहजच आकृष्ट होतात. हे सामंजस्य तुलसीदासांनी त्याकाळी भारतीय समाजात आणण्याचा प्रयत्न केला.

## समन्वयवादी दृष्टिकोन

मुसलमानी आक्रमणामुळे त्यांच्याच धर्माचा प्रचार आणि प्रसार सुरू झाला होता. भारतीय संस्कृती आणि धार्मिकता यांना जीवनासंबधी सर्वच क्षेत्रात ग्रहण लागले होते. हिंदु-मुस्लीम यांचा सतत संघर्ष आणि सहवास सुरू होता. या उभयधर्मीयात भावनांचा समन्वय होऊन पारस्परिक विरोधाचा ऱ्हास व्हावा म्हणून कबीरासारख्यांनी निर्गुण ब्रह्माच्या उपासनेचा पुरस्कार करून, आडम्बर माजविणाऱ्या, विरोधी भावना चेतविणाऱ्या बाह्याचारांचा निषेध केला. कबीराने लोकजागृतीसाठी केलेले प्रयत्न त्यांच्यानंतर संपले होते.

कृष्णभक्त जास्ती करून कृष्णभक्तीत, कृष्णाच्या कमनीय चारूतेत दंग होते. प्रेमात बुडाले होते. त्यायोगे लोकांना मन:शांति देण्याचा त्यांचा प्रयत्न प्रत्यक्ष व्यवहाराशी फारकत असल्याने म्हणावा तितका यशस्वी झाला नाही.

भारताचे वैशिष्ट्य असे आहे की अवशिष्टांचा नाश करून नवनिर्माण करण्याचा प्रयत्न येथे कधी सफल ठरत नाही. व्यापक समन्वयवादी दृष्टिकोनच आवश्यक असतो.

तुलसीदासांचे बालपण अत्यंत कष्टात गेले होते. समाजातील सर्वसामान्य लोकांना होणारे क्लेश त्यांनी अनुभवले होते. त्यामुळे समाजाबद्दल त्यांना सहानुभूती होती. समाजाच्या अंतरंगाचे सुस्पष्ट ज्ञान असणाऱ्या तुलसीदासांनी समाजासाठी काय उपयुक्त आहे हे जाणले आणि एक नवीन चेतना त्यांनी जागविली. त्यांच्या रूपाने विश्वांत तोड नाही असे समन्वयग्राही महत्त्वपूर्ण तत्त्व प्रस्फुटित झाले. त्यांनी जनजीवनात 'राम' आणला आणि त्यायोगे लोकांची मने उत्साहित केली. रामाचा आदर्श पुढे ठेवून त्यांची किंकर्तव्यमूढता घालविली. लोकांच्या सुप्त शक्ती जागृत केल्या. तत्कालीन मृतप्राय समाजास संजीवनी मुळी पाजली. नवीन जीवनदर्शन, नवीन दृष्टी दिली. खलांना वंदन त्यांनी केले, पण त्यांच्या समोर ते नमले नाहीत. एवढेच नव्हे तर योग्य तेथे त्यांची निर्भत्सनाही त्यांनी केली. आत्मकल्याण तर साधलेच पण लोककल्याणही साधले. 'सामर्थ्य आहे चळवळीचे। जो जो करील तयाचे। परंतु तेथे परमेश्वराचे। अधिष्ठान असल्यानेच त्यांचे प्रयत्न यशस्वी झाले.

## प्रेरक साहित्य

मध्यकालीन सर्व भारतभर संस्कृत आणि प्राकृत भाषांएवजी प्रचलित लोकभाषांमध्ये साहित्य निर्मितीस प्रारंभ झाला होता. काव्यात मुख्य वस्तु भाषा नसून भाव मुख्य आहे.हा भाव सुलभतेने सर्वांना ग्रहण करता येईल अशा भाषेत तो व्यक्त झाला पाहिजे. हे जाणून त्यांनी हिंदीत सर्व काव्यरचना केली. हिंदी भाषेला उच्च स्थान आणि सन्मान, विशेषत: 'मानसा' सारखी उत्कृष्ट काव्यरचना होऊ शकते हे पाहिल्यावर भाषा काव्याचे महत्त्व त्यांना मान्य करावे लागले. वर्णाश्रमव्यवस्थेवर तुलसीदासांचा पूर्ण विश्वास होता. भारतीय जीवनाची सर्वाधिक दृढ भिंत पारिवारिक जीवन ही आहे. पारिवारिक (कौटुंबिक) जीवनाची आदर्श प्रतिष्ठा हाच रामराज्या चा पाया आहे. प्रत्येक कुटुंब सुधारले तर राष्ट्र सुधारण्यास वेळ लागत नाही. त्यांत विकृती निर्माण झाली तर सारेच घराणे दु:ख, अशांति, कलह यांचा आखाडा बनते. लोकमर्यादा नष्ट होतात. रामायणातील उदाहरणे होतीच. तुलसीदासांनी श्रीरामचरितमानसात जी चरित्रे चित्रित केली आहेत ती अजरामर झाली असून त्यातून लोकांना सतत आदर्शाची जाणीव करून देऊन लोकजीवन समृद्धसंपन्न बनण्यास सहाय्यभूत होतील अशी आहेत. स्वत: विरक्त असूनही सर्वांच्या अंत:करणात लोकजीवनासंबंधी अदम्य उत्साह, आस्था निर्मिली. भावनासंपन्न साहित्यद्वारा आपले उच्च विचार लोकांपुढे मांडले. आपले ज्ञान आणि अनुभव यांत जर वास्तविक काही तथ्य असले तर काही व्यक्तिपुरते मर्यादित राखणे हे 'ज्ञात्याचे भंडपण' आहे म्हणून लोकशिक्षण आणि लोकहित यासाठी त्यांनी देह आणि लेखणी झिजविली! पारिवारिक जीवनाचा असा आदर्श तुलसीदासांनी लोकांपुढे ठेवला की ज्यास जगात तोड नाही. साम्यवादाची उच्च निर्मितीची कल्पना आणि तुलसीदासांचे

रामराज्य यातील साम्य लक्षणीय आहे. आजही प्रेरणा देणारे आहे. रामराज्यात सर्व जीवनावश्यक वस्तु फुकट मिळत होत्या!

## अचूक मार्गदर्शन

मर्यादापालनाचा आदर्श राखूनही ते रूढीविरूद्ध आहेत. तात्कालिन प्राय: सर्व विचारधारांचा ज्या विलक्षण आणि विचक्षण रीतीने समन्वय साधला ती रीत दर्शनीय आहे. ज्ञानमार्गी संताप्रमाणे ते कटु बनले नाहीत की भक्तिमार्गी संताप्रमाणे त्यांनी मौन पाळले नाही. जीवनासंबंधी अदम्य उत्साह, आनंदमयी स्फूर्ति आणि कर्तव्यनिष्ठा निर्माण करणारे उत्तरभारतातील तुलसीदास हे एकमात्र कवि आहेत. (महाराष्ट्रात समर्थ रामदास) सगुण-निर्गुण, शैव-वैष्णव कर्म-ज्ञान- भक्ति, निवृत्ति-प्रवृत्ती, भोग-त्याग, द्वैत-अद्वैत, गार्हस्थ्य वैराग्य, संस्कृत-प्राकृत तसे सर्व आश्रम, सर्व वर्ण यामध्ये समन्वयवादी दृष्टिकोन स्थापून कट्टरता दूर सारली. जीवनातील कुठलाही स्तर दोषपूर्ण नाही; व्यक्तीमध्ये दोष असू शकतील. प्रत्येकाने आपापले दोष जाणले पाहिजेत, घालविले पाहिजेत. भक्ती हाच समस्त मानसिक, लौकिक आणि आध्यात्मिक समस्या दूर करण्याचा अचूक खात्रीलायक उपाय आहे हे त्यांनी पटवून दिले. त्यांनी निर्मिलेले आदर्श यथार्थाच्या भरभक्कम पायांवर उभे आहेत. आदर्श आणि यथार्थ यांचा व्यावहारिक समन्वय त्यांनी साधला आहे. त्यांची भक्ती ईश्वरीय किंवा उच्च मानवीय गुणांचा विकास आणि त्यासंबंधी प्रेमभावात्मक आहे. निर्गुण ब्रह्मापेक्षा सगुण साकार रामरूप ईश्वराच्या आराधनेवर त्यांनी भर दिला. त्यांचा राम दीनबंधु, स्नेह निभावणारा आणि दुष्टांची दुष्टता दूर सारून त्यांचेही कल्याण करणारा आहे. सीतापतीच्या शील आणि स्वभावास तुलसीदासांनी हृदयंगम केले असून त्यांची भक्ति म्हणजे मानवतेचेच रूप आहे. ती जटिल, वैयक्तिक एकांगी साधना नसून सर्व जग प्रभूमय पाहून सेवाभावाचे शिक्षण देणारे, सर्वांगीण सामाजिक जीवनाचे सुंदर दर्शन आहे. म्हणूनच ते वारंवार भक्तीचा उपदेश करतात. भक्ती हा प्रशस्त राजपथ आहे. तो सर्वांना खुला आहे. भक्ती अंकुरली की मनुष्यातील दुर्गुण कमी होऊ लागतात. इतर साधनात अहंकार वाढण्याचा धोका असतो. विकारग्रस्त होण्याचा संभव असतो. भक्तिमार्गात, समविषम परिस्थितीत रामाचा, त्याच्या कृपेचा आधार असतो. भक्तिमार्गाच्या या सरलतेमुळे, नि:शंकतेमुळे तुलसीदासांनी त्या काळात लोकांची मने दृढ आस्था, आस्तिक्य, परस्परांविषयी विश्वास, प्रेम यांनी भारून टाकली. त्यामुळे लोकांना जीवन सुसह्य झाले. कार्य, अकार्य यांचा निर्णय करण्यास त्यांची मने समर्थ ठरली. आणि हिंदू धर्म आणि भारतीय संक्रुती यांनी तग धरला. आजही जीवनासंबंधी आस्था प्राप्त करण्यास ते आधार देतात. त्यांच्या रचनांचा अभ्यास करणारी व्यक्ती कुठल्या प्रसंगी कसे वागावे या भ्रमांत कधीही पडत नाही. त्यांच्या प्रेरणा बौद्धिक आणि भावनिकही असतात. आपल्या मनावर ते नेहमी उदात्त संस्कार करतात. ज्यावरून आपण आपले आचरण पारखून घेऊ शकू असा मानदंड आपणास प्राप्त करून देतात. कुठल्याही काळात अचूक मार्गदर्शन करण्याची क्षमता त्यांच्या साहित्यात आहे. युगायुगाचे ते संस्कारक असून त्यांचे साहित्य नित्य उच्च आदर्शाकडे जाण्याची प्रेरणा देत असते. प्रत्येक भारतीयास त्यांचा अभिमान वाटून तो त्यांच्यापुढे नतमस्तक होतो.





||११||

# तुलसी साहित्याची थोरवी व शिकवण

तुलसीदास हे सर्वाधिक लोकप्रिय भारतीय संतकवी असून, त्यांचे ग्रंथ हे त्यांच्या जीवनाच्या दृष्टीने महत्त्वाचे, त्यामुळे त्याबद्दल थोडीफार तरी माहिती द्यायलाच हवी. त्यांच्या आयुष्यातील जवळजवळ पन्नास वर्षे त्यांच्या हातून साहित्य सेवा घडली. त्या लेखनाने त्यांना आंतरिक समाधान तर लाभलेच शिवाय लोककल्याण साधले गेले. लेखनामागे मुख्यत: आध्यात्मिक प्रेरणा असली तरी त्यांनी 'नानापुराणनिगमागमसंमतं' असे 'गावत् बेद पुराण अष्टदस। छओ सास्त्र सब ग्रंथन को रस।' रूपी जीवनाचे जे यथार्थ दर्शन लोकादर्श अशा रामचरित्राद्वारे लोकांना घडविले आहे, ते सर्वांना सर्वसमयी उपयुक्त असे असून, सर्व जगालाच शाश्वत संदेश देणारे आहे. साहित्य पक्षांबरोबर, आचारधर्म, नीती, संस्कृती, राजनीति इत्यादी अन्य पक्षांचा व्यवहारिक रूपाने समावेश त्यांच्या काव्यात झालेला दिसतो. त्यांची कला लोककाव्याची स्वाभाविकता आणि साहित्यिक परंपरा या दोन्हींना धरून असल्याने लोकांचा साहित्याशी आणि साहित्याचा लोकांशी समन्वय साधण्याचे अपूर्व कार्य साधले गेले आहे. त्यांच्या प्रामाणिक म्हणून मानलेल्या ग्रंथांचा सामान्य कालक्रम असा आहे.

**प्रारंभिक** (वि. सं. १६११ ते वि. सं. १६२५ पर्यंतची रचना)

१) रामलला नहछू (वि.सं. १६११-१६१२)

२) वैराग्य - संदीपनी (वि.सं. १६१४ च्या सुमारास)

३) रामाज्ञा - प्रश्न (वि.सं. १६२१)

**मध्यकालीन** (वि.सं. १६२६ ते वि.सं. १६४५ पर्यंतची रचना).

४) जानकी मंगल - (वि.सं. १६४४)

५) श्रीरामचरित मानस (वि. सं. १६३१)

६) सतसई (वि. सं. १६४१ च्या सुमारास)

७) पार्वतीमंगल (वि.सं. १६४३) जय संवत फाल्गुन शुद्ध ५ गुरूवार.

**उत्तरकालीन** (वि.सं. १६४६ ते १६६० पर्यंतची रचना)

८) गीतावली (वि.सं. १६५३ मध्ये संपादन, विस्तृत काळात रचना झाली)

९) विनयपत्रिका (वि.सं. १६५३ मध्ये गोस्वामींनी संपादन केले- विस्तृत काळात रचना झाली)

१०) कृष्णगीतावली (वि.सं. १६५८ च्या सुमारास)

**अंतिम आणि अपूर्व रचना** (वि.सं. १६६१ ते वि.सं. १६८०)

११) बरवै रामायण - (संभवत. नंतर संकलन, विद्वानात मतभेद)

१२) दोहावली - (वि.सं. १६५६ ते १६७६ च्या काळातील रचना, गोस्वामींच्यानंतर संकलन)

१३) कवितावली (हनुमान बाहुकसहित) (वि.सं.१६६९ संग्रह ग्रंथ अंतिम रचना वि.सं. १६८०

।।श्रीसद्‌गुरु प्रसन्न।।

।।राम।।

# गोस्वामी तुलसीदासांचे साहित्य

## रामलला - नहछू

याची रचना अवधी - बोलीभाषेत असून सरस आहे. हा सोहर छंदात लिहिलेला छोटासा ग्रंथ आहे यांत २० छंद आहेत. व ते अवध आणि बिहार प्रांतात प्रचलित आहेत. विविध संस्काराच्या वेळी या छंदात स्त्रिया गीते गातात. प्रत्येक चरणांत साधारणतः २२ मात्रा असतात. रामाच्या यज्ञोपवीत संस्काराच्या वेळी हा छंद गायला गेला असे कल्पिले आहे. राम + लला + नहछू लला हा शब्द व्रजभाषेंतील असून हिंदी शब्द 'लाल' पासून 'लला' व नहछू = नरवक्षौर (संस्कृत) पासून नहछुर-पासून 'नहछू' शब्द आला आहे. काही ठिकाणी 'नारवुर' म्हटले जाते.

या संस्कारांत सर्व प्रथम 'नाईन' (न्हावीण) हळदी वगैरेने नरवांना स्पर्श करते आणि नंतर 'नहरनी' ने त्याना कापते. हा नहछू विवाहाच्या वेळचा की यज्ञोपवीत संस्काराच्या वेळचा याबद्दल मतभेद आहे. पण विवाह जनकपुरीत झाला, यज्ञोपवीत संस्कार अयोध्येंत झाला. 'कोटिन्ह बाजन बाजहि दशरथके गृह' या वर्णनावरून हा यज्ञोपवीत संस्काराच्या वेळचा असावा असे वाटते. यज्ञोपवीत संस्कार १२ व्या वर्षी होतो, रामाच्या संकोचाचे वर्णन यांत आहे. मानसांत वा गीतावलीत या संस्काराचे सविस्तर वर्णन नाही. 'उपवीत ब्याह उछाह जे सिय़राम मंगल गावही' या मानसांतील उल्लेखावरूनही हे गीत 'उपवीत' संस्काराच्या वेळचे असावे.

**रचनाकाल :** भाषा, भाव आणि शैलीवरून हा प्रारंभिक अवस्थेत लिहिला गेला असावा सर्व प्रथम ग्रंथ असून तुलसीदासांचा जन्म १८५९संवत मध्ये झाला असे धरले तर संवत् १६११, १२ हा रचनाकाल असावा.

खंडकाव्य ही नाही, घटना काव्य म्हणता येईल. भाषा आणि भाव या दृष्टीने उच्च कोटीचा ग्रंथ नाही. केवळ अन्त्यानुप्रास अलंकार आहे. स्वभावोक्ति हा प्रधान अलंकार असून शूद्र वर्णाच्या स्त्रियांचा सन्मान केल्याचे दिसून येते. लोहारीण, तांबोळीण, शिंपीण, मोचीण, माळीण, न्हावीण या सारखे उल्लेख आहेत.

## रामाज्ञा-प्रश्न

हाहि प्रारंभिक ग्रंथापैकी एक ग्रंथ असून यांत सात सर्ग आहेत. प्रत्येकांत ७/७ सप्तक व त्या प्रत्येकांत ७/७ दोहे असे एकूण ३४३ दोहे आहेत. यांत शकुन-विचार केला आहे.

अंतिम सप्तकांत शकुन विचारण्याची पद्धतिही दिली आहे.

तुलसीदासांनी आपला ज्योतिषी मित्र गंगाराम याच्या शकुन विचारार्थ ह्या ग्रंथाची रचना केली. प्रथम सर्गाच्या सप्तम सप्तकांतील सातव्या दोह्यांत गंगारामाच्या नांवाचा उल्लेख आला आहे.

सगुन प्रथम उनचास शुभ, तुलसी अति अभिराम।

सब प्रसन्न सुर भूमिसुर, गोगन गंगाराम॥

डॉ. ग्रियर्सन यांच्या 'नोटस् ऑफ तुलसीदास' यांत पुढील उल्लेख मिळतो. काशीमध्ये राजघाटचा राजा गहरवार यांचे पुत्र शिकारीसाठी वनांत गेले असतां बातमी आली की वाघाने त्यास खाल्ले. राजाने प्रल्हाद घाटावर निवास करणाऱ्या गंगाराम यांना बोलावून प्रश्न पहाण्यास सांगितले. तेव्हां गंगाराम चिंताग्रस्त झाले. त्यांची आणि तुलसीदासांची घनिष्ठ मित्रता होती त्यामुळे तुलसीदासांनी त्यांना आश्वासन दिले. व सहा तास परिश्रम पूर्वक उपासना केली व 'रामाज्ञा प्रश्न' ची रचना केली आणि सांगितले की दुसऱ्या दिवशीं संध्याकाळी १ घटिका दिवस बाकी असतांना राजकुमार येतील.

त्याप्रमाणे घडले आणि राजाकडून ज्योतिषी गंगाराम यांना १ लाख रुपयांचा पुरस्कार मिळाला. असे म्हणतात की तुलसीदासांनी त्यांतून बारा हजार रुपये घेऊन १२ हनुमान मंदिरे निर्मिली. पण ही कथा सत्य असेलच असे नाही.

रचनाकाल - 'सगुन सत्य ससि नयन गुन अवधि अधिक नय बान।

होइ सकल सुभ जासु जसु, प्रीति प्रतीति प्रमान॥ (रामाज्ञा प्रश्न ७- ७-३)

यांत संकेत द्वारा शशिने १, नयन याने २, गुण याने ६ तथा नय ४ एवं बाण याने ५ में १ अन्तराच्या अंकविपर्यय द्वारा सं.१६२१ ध्वनित केला आहे.

रामाज्ञा प्रश्न काव्यकलेच्या दृष्टीने श्रेष्ठ ग्रंथ नाही. शकुन विचारांवर आधारित रचना असून यांतील रामकथा वाल्मीकी आणि अध्यात्म- रामायणावर आधारीत आहे. मानसांतील आणि यांतील घटनामध्ये काही महत्त्वाचे भेद आहेत. उदाहरणार्थ १) शिकारीस गेलेल्या राजा दशरथास पुत्रशोकाने संतप्त अशा अंध मुनीचा शाप मिळणें, २) पुष्पवाटिकेंत सीताराम भेट नाही. ३) विवाहाची शुभवार्ता शतानंदाबरोबर जनकांनी अयोध्येस धाडली आहे. ४) परशुराम प्रसंग - वरात अयोध्येस परतत असतांना मार्गांत घडला आहे. ५) लक्ष्मण - परशुराम, राम-केवट वगैरे संवादांचे वर्णन नाही. प्रामुख्याने शकुन विचार असल्याने प्राय: प्रत्येक दोह्याच्या तिसऱ्या किंवा चवथ्या चरणांत मंगलसूचक शब्द आहे. या ग्रंथांतील २०/ २२ दोहे 'दोहावली'त आढळून येतात.

हे प्रबंध काव्य असून कथाक्रम आहे. पण प्रमुख घटनांचा उल्लेख केवळ सांकेतिक आहे. कारण यांत कथा वर्णनाची लालसा मुख्य नसून शकुन विचारास प्राधान्य आहे.

## वैराग्य-संपीपिनी

हा छोटा ग्रंथ असून यांत ६२ छंद, छंद, दोहा, सोरठ आणि चौपाई आहेत. २ सोरठे आणि १४ चौपाया व बाकीचे दोहे आहेत. वैराग्य संदीप्त करणारा ग्रंथ असून अनेक पदांत 'तुलसी' चे नांव आले आहे. तुलसीदासांच्या इतर ग्रंथांशी बरेच पद्य साम्य, भाव साम्य आहे.

**रचनाकाल :** यौवनकालीन ग्रंथात भाव विश्रृंखलता आढळते व काव्यही निकृष्ट आढळते. 'रामलला नहछू' मध्ये कविहृदय वासनापूर्ण असावे असे वाटते त्याअर्थी ते काव्य गृहस्थाश्रमांत झाले असावे. वैराग्य संदीपिनी मध्ये वैराग्याचे विवेचन आहे. गार्हस्थ्य जीवन संवत् १६२७ मध्ये समाप्त झाले असावे. यावरून या काव्याची रचना संवत १६२७ च्या आसपास झाली असावी.

**विषय :** ग्रंथात प्रथम रामध्यान, रामनाम महिमा वर्णन, शरीराची अनित्यता, राम-शरणागतीचे माहात्म्य, नंतर संत स्वभाव वर्णन, संत महिमा वर्णन आणि शांतीचे वर्णन (शांत संतांची लक्षणे आणि महात्म्य वर्णन) आहे. ग्रंथ समन्वयवादी असून वेद, उपनिषदे, आणि पुराणांचा समन्वय आढळून येतो.

'तुलसी वेद-पुरान-मत, पूरन शास्त्र विचार।

यह विराग - संदीपिनी, अखिल ज्ञान को सार॥ " असे म्हटले आहे.

अत्यंत सूक्ष्मतः परंतु गंभीर ढंगाने प्रतिपादन असून अलंकारिकता नाही. रूपकाची छटा अधून मधून आहे. उदाहरणार्थ

"हृदय - कमल फूलै नहीं बिनु रविकुल - रवि - राम ।'

"तुलसी यह तनु खेत है, मन वच कर्म किसान ।

पाप पुन्य द्वै बीज है, बवै सो लवै निदान॥ "

क्वचित कबीराचा प्रभाव दिसून येतो. पहा

'तुलसी जाके बदन तें धोखेउ निकसत राम।

ताके पग की पगतरी, मेरे तनु को चाम ॥ वै. सं. ३७

'सुपनेउं बदाइके, धोरवेउ निकरे नाम।

ताके पग की पेंतरी। मेरे तनु को चाम॥ (कबीर वचनावली 'नाम' दोहा ४२)

## पार्वती - मंगल

अवधी भाषेतील हे एक छोटे प्रबंध काव्य असून यांत १६४ छंद आहेत. १४८ सोहर आणि १६ हरिगीतिका असून ८ सोहर नंतर १ हरिगीतिका आहे. यांत शिव-पार्वती विवाहाचे वर्णन आहे.

# मंगलकाव्य परंपरा

ऐहिक पारलौकिक कल्याणाच्या दृष्टिकोनांतून या काव्यांची निर्मिति झाल्याचे दिसून येते. भागवत संप्रदायांत अशी अनेक स्तोत्रे आढळतात. जगमंगलार्थ यांची रचना झालेली असते. बंगालीत अनेक मंगल काव्यें आहेत. हिंदीतही आचार्य हरिप्रसादजी यांचे 'विनय मंगल' कबीराचे 'आदि मंगल, अनादि मंगल आणि अगाध-मंगल, नंददासकृत 'रूक्मिणी - मंगल', गोस्वामी तुलसीदासांचे, 'पार्वती- मंगल' आणि 'जानकी-मंगल' ही प्रसिद्ध आहेत.

पार्वती मंगल - आणि रामचरितमानसांतील कथेत शिवपुराणानुसार बरेच साम्य आहे. फरक एवढाच की शिवजी स्वतः ब्रह्मचारी वेषाने पार्वतीची परीक्षा घेण्यास आले आहेत. कालिदास यांच्या 'कुमार संभवा' शी साम्य आढळून येते. ब्रह्मपुराण आणि कालिका पुराणांत ही घटना संक्षेपाने असून शिवपुराणांत सविस्तरवर्णन आहे. कुमार संभवांतील काही श्लोकांचा सहीसही अनुवाद आढळतो. पण तुलसीदासांनी मर्यादा-भंग केलेला नाही.

**पार्वती-मंगलचे कथासार :** हिमालयाची धर्मपत्नी मैना हिला एक सुंदर कन्या झाली. तिचे नांव पार्वती. उत्तम पालन पोषण केले गेले. कन्या उपवर होताच मातापित्यांना विवाहाची चिंता लागली नारद मुनींचे आगमन त्यांनी सांगितले हिला बावळा नवरा मिळेल. ऐकून मातापिता कष्टी झाले. तेव्हां नारदांनी सल्ला दिला की हिला भगवान् शंकरास द्या. पण त्यासाठी कन्येस तप करू दे. यानंतर पार्वतीने घोर तप आरंभले - देवांनी कामदेवास शंकराकडे धाडले. भगवान शंकर समाधिमग्न होते समाधी भंग होतांच भगवान् शंकरांनी कामदेवास जाळून भस्म केले. तेव्हां सर्व देव भयभीत होऊन शरण आले. पार्वतीचे अधिक उग्रतर तप पाहून भगवान् शंकरांनी ब्रह्मचारी वेषाने तिची परीक्षा घेतली व एकनिष्ठता पाहून प्रसन्न झाले व सप्तर्षींना हिमालयाकडे धाडले. नंतर वरातीची भयानकता व अखेर शिवांनी सुंदर रूप धारण केल्यावर आनंदात विवाहोत्सव पार पडला व पार्वती सह भगवान् कैलासास परतले. याप्रमाणे कथाभाग आला आहे.

'जानकी मंगल' आणि पार्वती मंगलाची भाषा, छंद आणि शैली मिळती जुळती आहे. राम आणि शिव यांच्याविषयी समान भावना दिसून येते. रामभक्ति-मंजूषा 'विनयपत्रिके' तही तुलसीदासांनी सर्व प्रथम शिव आणि त्यांचा परिवार यांची स्तुति केली आहे. एकाच लेखकाच्या या दोन कृती असल्याने साम्य खूप आहे उदाहरणार्थ :

'कल्यान काज उछाह ब्याह स्नेह सहित जो गाईहै ।

तुलसी उमा-संकर-प्रसाद प्रमोद मन प्रिय पाईहै ॥ (पार्वती-मंगल)

उपबीत ब्याह उछाह जे सिय राम मंगल गावही ।

तुलसी सकल कल्यान ते नर नारि अनुदिनु पावही ॥ (जानकीमंगल)

रामचरितमानसाशी भाव साम्य आणि भाषा साम्य असून त्यांतील अनेक भाव जसेच्या तसे पार्वती मंगलाशी मिळते जुळते आहेत.

**रचनाकाल :** 'जय संवत्, फाल्गुन सुदि पाँचै, गुरु दिनु ।

आखिनि विरचेउँ मंगल, सुनिसुख छिनु, छिनु ॥

सं. १६४३ फाल्गुन शुक्ल पंचमी गुरुवार हा रचनाकाल ठरतो.

प्रबंध काव्य असून प्रबंधकत्वाचा अभाव आहे. अत्यंत सूक्ष्मतेने कथा सूचित केली आहे. श्रृंगार रसाचे, त्यांतहि वियोग श्रृंगाराचे वर्णन असून वरातीच्या वर्णनांत हास्य आणि भयानक रस आहेत. विवाह संस्काराचे सुंदर वर्णन, द्वारावर व्याही भेट, आरती, ओवाळणे, अर्घ्यदान, शाखोच्चार, कन्यादान, सप्तपदी, हास्यविनोद, वरवधूचा संकोच, द्यूतक्रिया, शेवटी भोजन समारंभ वगैरे सविस्तर वर्णिले आहे. अनुप्रास, उत्प्रेक्षा, दृष्टान्त, अनन्वय, रूपकोत्प्रेक्षा, रूपक आदि अलंकार आले असून श्रीरामचरितमानसानंतर ह्या ग्रंथाची रचना झाली असावी.

## जानकी-मंगल

अवधीतील हे खंड काव्य असून त्यांत एकूण २१६ छंद आहेत. २४ हरिगीतिका आणि बाकीचे सोहर आहेत. 'पार्वती-मंगल' चीच शैली असून ८ सोहरनंतर एक हरिगीतिका येते. रामचरितमानसांत राम- जानकी विवाहाचे वर्णन आले आहेच. पार्वती-मंगल आणि जानकी- मंगल दोन्ही स्तोत्रें पाठांतर करण्यासारखी असून 'अघविनाशार्थ' त्यांची रचना झाली आहे.

काव्यांत सूक्ष्मता असून कथा तारतम्यांत सुसंगती आहे. वधू जानकीच्या नांवावरून ग्रंथाचे नांव ठेवलेले आहे. वधूने वर निवडलेला असतो यांतच 'स्वयंवरा'ची सार्थकता असते. जनकाची पुत्री ती जानकी. मानसांतील अनेक वचने, शब्द आणि भाव यांत दिसून येतात. हा ग्रंथ तुळसीकृतच आहे याबद्दल सर्वांचे एकमत आहे.

**रचनाकाल :** वेणीमाधवदासांनी 'मूलचरित' मध्यें 'रामलला नहछू' आणि दोन्ही मंगलांची रचना मिथिलेत झाली असे म्हटले आहे. व मिथिलेत गोस्वामी संवत् १६४०च्या आरंभापर्यंत राहिले आहेत. "मिथिला ते काशी गए, चालिस संवत् लाग।" पण गोस्वामींच्या रचनाकालानुसार संवत १६४३ मध्ये 'पार्वतीमंगल' आणि संवत् १६४४ मध्ये जानकी मंगल रचले गेले असावे.

डॉ. माताप्रसाद गुप्त म्हणतात संवत् १६२० मध्ये याची रचना झाली असावी. कारण परशुराम प्रसंग 'रामाज्ञा-प्रश्न' प्रमाणे अयोध्येच्या मार्गावर घडला आहे. गीतावलीतही असेच वर्णन आहे पण गीतावलीची रचना १६५३ संवत मध्यें मानतात. कथेच्या दृष्टीने प्रबंधात्मकतेत फार शिथिलता आहे. स्तोत्ररूपानेच खरे तर रचना झाली आहे. रामास ब्रह्माचा अवतार गणले आहे. 'ए परमारथ रूप ब्रह्ममय बालक' (विश्वामित्र-जनक संवाद). 'अंतरजामी राम मरम सब जानेउ' (राम = ब्रह्म, सीता = माया) अलंकारांचा उपयोग बऱ्याच ठिकाणी केला असून त्यांत उत्प्रेक्षा विशेष आहेत. शिवाय रूपक, अनन्योपमा, विषम दृष्टान्तादि आहेत.

# बरवै रामायण

हे सप्त काण्डात्मक अवधी भाषेतील एक छोटे प्रबंध काव्य असून त्यांत ६९ बरवै आहेत. स्फुट काव्य म्हणूनच हे रचले असावे. व नंतर संकलन केले असावे.

या ग्रंथातील सीतेच्या सौंदर्याचे वर्णन भक्त श्रेष्ठ तुलसीदासांच्या स्वभावास प्रतिकूल वाटणारे आहे. तसेच रचनेत सुसूत्रतेचा अभाव जाणवतो. त्यावरूनहि स्फुट रचनेचे नंतर संकलन केले असावे असे जाणवते.

तुलसी रहीमचे समकालीन होते. त्यांच्यात परस्पर पत्र व्यवहारही होत असे. रचना परस्परांस दाखवीत असत. रहीमनें 'बरवै-नायिका- भेद' नामक ग्रंथ लिहिला. संभवतः त्या योगे प्रेरणा मिळून तुलसीदासांनी 'बरवै-रामायण' लिहीले असावे. ग्रंथारंभीचे सीतेच्या सौंदर्याचे '(सालंकारिक) वर्णन नायिकेच्या सौंदर्य वर्णनापेक्षां कमी नाही. प्रथम बरवैत अतदगुण, २/३ मध्ये व्यतिरेक, पांचव्यांत उन्मीलित तद्‌गुण आणि सहाव्यात मीलित तद्‌गुण अलंकारांचा प्रयोग आहे. त्यामुळे सीतेच्या सौंदर्य वर्णनात नायिकेच्या सौंदर्याचे साभिप्राय वर्णन आहे. वर्णन श्रृंगारिक आहे पण अश्लील नाही।

'कवि रहीम बरवै रचे, पठए मुनिवर पास ।

लखि तेइ सुन्दर छंद मे, रचना किएउ प्रकास॥ (मूलचरित)

या बरवै रामायणात 'तुलसी' नामा बरोबर जे भाव ग्रथित झाले आहेत ते तुलसीदासांचेच आहेत.

'लखन राम सिय सुमिरहु तुलसिदास।'

'राम-नाम पर तुलसी नेह निबाहु।'

'राम जपत भए तुलसी तुलसिदास।'

'जनम जनम जहँ जहँ तनु तुलसि हि देहु।

तहँ तहँ राम निबाहिब नाम-सनेहु॥'

'राम नाम जपु तुलसी होइ बिसोक ।

याशिवाय यांतील कित्येक पद्यांश तुलसीदासांच्या इतर काव्यांत मिळतात. उदा. गीतावली, रामचरितमानस, दोहावली - उत्तरकांड भक्ति पूर्ण आहे.

**रचनाकाल :** मूळगोसाईचरित मध्ये लिहिल्याप्रमाणे रहीमचे बरवै वाचून या ग्रंथाची रचना झाली. पं.रामचंद्र शुक्ल त्यांच्या 'तुलसी ग्रंथावली - तृतीय खंड' प्रस्तावनेत म्हणतात -

एका गरीब ब्राह्मणाच्या कन्येचा विवाह ठरतो. द्रव्याचा अभाव असल्याने तो गोस्वामी तुलसीदासांकडे आला. गोस्वामींनी एका पत्रांत दोह्याची एक ओळ लिहून त्यांस खानखानांच्या जवळ धाडला.

'सुरतिय, नरतिय, नागतिय सब चाहत अस होय'।

खानखानांनी त्यांस खूप द्रव्य देऊन ही दुसरी ओळ लिहून परत धाडला.

'गोद लिये हुलसी फिरे, तुलसी सो सुत होय॥

रहीमच्या 'बरवै रामायणा'चा काल संवत् १६५३ असावा. डॉ. श्यामसुंदर दास 'बरवै रामायणा'चा काल संवत् १६६९ मानतात तर डॉ. रामकुमार वर्मा, हा संकलनाचा काल मानतात व तेच योग्य वाटले. कारण आरंभी स्फुट रचना करून नंतर संकलन केले असावे.

श्री सद्गुरुचरण अवस्थी यांनी याचा रचनाकाल सं.१६१९ मानला आहे. मानसांत आणि रहीमच्या दोह्यांत साम्य आढळते.

'दीरघ दोहा अरथ के आखर थोर माहि' - रहीम

'अर्थ अमित अति आखर थोरे' - तुलसी

'रहिमन धोके भावसे, मुखसे निकसे राम' - रहीम

'तुलसी जिनके मुखनसे, धोखेउ निकसत राम' - तुलसीदास

पण रहीमचा जन्मकाल संवत् १६१३ असल्याने हे अनुमान ठीक नाही अब्दुल रहीम खानखाना - संवत् १६४६ ते ४८ पर्यंत काशींत सुभेदार होते. त्यावेळी बरवै रामायण गोस्वामींनी रचले असावे. ('तुलसीदास और उनके ग्रंथ - श्री. भगिरथ प्रसाद दीक्षित - पृष्ठ १०९)

'मरत कहत सब, सब कहँ सुमिरहु राम ।

तुलसी अब यहि जपत समुझि परनामु ॥६५॥

तुलसी राम नाम सम मित्र न आन ।

जो पहुँचाव रामपुर तनु अवसान ॥६७॥

नाम भरोस नाम बल नाम सनेहु।

जनम जनम रघुनंदन तुलसिहि देहु॥६८॥

जनम जनम जहँ जहँ तनु तुलसिहि देहु।

तहँ तहँ राम निबाहब नाम सनेहु ॥६९॥ (बरवै रामायण)

यावरून गोस्वामींची वृद्धावस्था सूचित होते. प्रत्येक बरवै मध्ये अलंकार- असून शब्दसंहिती, पद-संगठन, आणि वर्ण मैत्रीची अनेक उदाहरणे दिसून येतात. 'बरवै' मध्ये प्रथम व तिसऱ्या चरणांत १२ मात्रा आणि द्वितीय व चतुर्थ चरणांत ७ मात्रा असून अंती 'जगण' किंवा 'तगण' चा प्रयोग आढळतो. आकाराने लहान पण काव्यगुणांनी मंडित, भाव, भाषा आणि कला या दृष्टीने उच्च कोटीची अशी ही एक कलात्मक काव्यकृती आहे.

## गीतावली

'गीतावली' हा एकूण ३२८ पदांचा (गीतांचा) संग्रह आहे. तुलसीकृत ब्रजभाषेतील 'विनयपत्रिके' नंतर हा दुसऱ्या क्रमांकाचा ग्रंथ आहे. 'विनयपत्रिका' सर्वोत्कृष्ट मानली जाते.

गीतावलीची रचना विनयपत्रिकेच्या आधी झाली असून यांत आसावरी, जैतश्री, बिलावल, केदारा, सोरठ, धनाश्री, कान्हरा, कल्याण, ललित, विभास, नट, टोडी, सारंग, सूहो मल्हार, गौरी, मारू भैरव, चंचरी वसंत, रामकली इत्यादि रागांतील रचना आढळून येते. संगीताचार्य कवि-शिरोमणी तुलसीदासांच्या विनयपत्रिकेतील पदेंही रागदारीतील आहेत.

यांत सप्तकांडात्मक रामकथा क्रमशः वर्णिली आहे. एका पदानंतर दुसरे पद क्रमशः कथेच्या दृष्टीनेच आले आहे. पण हे महाकाव्यही नाही आणि खंडकाव्यही नाही. भावकाव्य असे म्हणू हवे तर! खंडकाव्याप्रमाणे जीवनांतील एकाद-दुसरी घटना केवळ नाही तर संपूर्ण रामचरित्र आहे. गायक संत आणि गायनप्रेमी लोक यांच्यासाठीच ग्रंथ निर्मिति झाली असावी. रागदारीत रामकथा लिहून ती या ग्रंथात संकलित केली असावी. राम अवतारी पुरुष असल्याचा उल्लेख सर्वत्र आहे.

**कथासार : बालकांडात** सर्व प्रथम रामजन्माचे वर्णन असून दुसऱ्या छंदापासून १८व्या पदापर्यंत आनंदोत्सव, मंगलाचार, बालक्रीडा आणि अयोध्येतील आनंदाचे वर्णन आहे.

पद १९ ते ३२ - बालरामाच्या सौंदर्याचे वर्णन असून पद ३३ ते ३७ रामचंद्राचे प्रातः जागरण आणि क्रीडा यांचे वर्णन आहे.

पद ३८ ते ४४ यांत चारी बंधुच्या खेळांचे वर्णन आहे. पद ५९ ते १०१ यांत रामलक्ष्मणांचे जनकपुर गमन, धनुष्य भंग, राजा दशरथांचे मिथिलागमन व पद १०२ ते १०८ पर्यंत राम-सीतेच्या सौंदर्याचे व पाणिग्रहणाचे वर्णन आहे.

**अयोध्याकांडात** प्रारंभी राम राज्याभिषेकाची तयारी दर्शवून नंतर पद ४२ पर्यंत कैकयीकृत विघ्न, रामवनगमन, सर्वांची विरहव्याकुलता आणि विलाप आणि ग्रामीण जनांचे दुःखोद्गार यांचे चित्रण आहे. पद ४३ ते ५० पर्यंत चित्रकूटचे फार सुरेख वर्णन आले आहे. नंतर ५१ ते ५५ पदांत कौसल्येची विरहव्यथा आणि दुःखाचे वर्णन आहे. आणि ५६ ते ६० पदापर्यंत राजा दशरथांचे स्वर्गगमन आहे. पद ६१ ते ८७ पर्यंत संपूर्ण भरत चरित्राचे वर्णन असून पद ८८/८९ मध्ये कौसल्येच्या वात्सल्याचे वर्णन आहे.

**अरण्यकांडात** १७ पदे आहेत. मृग मारीच वध, सीताहरण, जटायुमिलन, शबरी आश्रमांत आगमन हा कथाभाग येतो.

**किष्किंधाकांडात** केवळ २ पदे आहेत. सीतेची वस्त्रे, अलंकार पाहून रामांची व्याकुलता, व दुसऱ्यांत सीतान्वेषणा संबंधी सुग्रीवाची उदासीनता वर्णन केली आहे. सुंदरकांडात ५१ पदें आहेत. त्यांत हनुमान चरित्र, रामप्रभूंचे सुवेल आगमन, आणि सीता त्रिजटा संवाद आला आहे.

**लंकाकांडात** २३ पदे आहेत. त्यांत अंगद - रावण संवाद, राम-रावण युद्ध, रावणवध आणि रामांचे अयोध्येस आगमन हा कथाभाग आहे. उत्तरकांडांत ३८ छंद असून त्यांत विविध विषय आले आहेत. छंद २३ पर्यंत अयोध्येतील वैभवाचे, उत्सवांचे आणि राम-सौंदर्याचे वर्णन असून नंतर सीता वनवास आणि मुनि आश्रमांत लवकुल-जन्म यांचे मार्मिक

वर्णन आहे. ३७ व्या छंदात रामभरताचे भ्रातृप्रेम आणि ३८ व्या छंदात (सीता वनवास सोडून) संक्षिप्त रामचरित गान आले आहे.

'गीतावली'स प्रबंध काव्य म्हणतां येत नाही. यांत कथाक्रम आहे. पण काही प्रसंगांचा अनावश्यक विस्तार, कांहीचा केवळ संकेत तर काहीना स्पर्शही केलेला नाही. किष्किंधा कांडात संक्षेपाची प्रवृत्ति आढळते. या कांडांतील सर्व महत्त्वाच्या घटना केवळ २ पदांत आणल्या आहेत.

## काही वैशिष्टचें

१) बाललीला आणि ग्रामवधूंचे सुमनोहर आणि मधुर संभाषण अन्य प्रसंगापेक्षा अधिक विस्तृत आहे.

२) परशुराम वरात परतण्याच्या वाटेवर भेटल्याचे वर्णन आहे.

३) केवट प्रसंग - संभाषण यांत नाही. (कवितावलिंत हा प्रसंग खुलवला आहे.)

४) रामांच्या चित्रकूट-निवासांत जनकांचे आगमन यांत नाही.

५) सेतुबंधाच्या वेळी शिवलिंग स्थापनेचे वर्णन  नाही.

६) लंकादहनाचे वर्णन यांत नाही.

७) सीतेचा परित्याग आणि लवकुश जन्माची कथा यांत आली आहे (मानसांत नाही).

**रचनाकाल :** हे गीतिकाव्य असून रचना मानसानंतर झाली असावी. गीतावली, कृष्ण गीतावली आणि विनयपत्रिका यांत शैली साम्य आहे. याचे पहिले नाव 'पदावली रामायण होते व विनयपत्रिकेचे 'राम- गीतावली' होते. बदल केव्हां झाला हे सांगतां येत नाही. डॉ. रामकुमार वर्मा म्हणतात याची रचना संवत १६४३ मध्ये झाली असावी. गीतावली आणि सूरसागर यांतील साम्य लक्षणीय आहे. कांहींच्या मते हे स्फुट-गेय काव्य असून यांत मंगलाचरण नाही, घटनांचा क्रम असंबद्ध असून चरित्राचा पूर्ण विस्तार नाही.

**रामाज्ञा-प्रश्नाशी साम्य :**

१) परशुराम प्रसंग वरातीचे वाटेवर आहे.  २) केवट प्रसंग नाही

३) चित्रकूटला जनक राजांचे आगमन नाही. ४) शिवलिंगस्थापना नाही.

५) सीता त्याग आणि लवकुशजन्म वर्णन आहे.

**मानसाशीं साम्य :**

१) पुष्पवाटिका प्रसंग २) जनकांचा क्षोभ आणि लक्ष्मणाचे प्रत्युत्तर, ३) अंगद शिष्टाई.

## गीतावलीतील भर

१) वनांत दंडकारण्यांत जाणाऱ्या रामाचा समाचार निषादराज अयोध्येस धाडतो. २) देवता रामाची व्यथा जाणून सीतेचा पत्ता सांगतात. ३) हनुमंतास ओळखून सीता रामाची कुशलता विचारते आणि मुद्रिका उत्तर देते आणि ते उत्तर ऐकून हनुमंतास दुःख होते. ४)

विभीषण मातेचा आणि कुबेराचा सल्ला घेतो आणि शंकरांच्या प्रेरणेने श्रीरामास शरण जातो. ५) राज्याभिषेकानंतरचे आनंदोत्सव, दीपोत्सव, होली वगैरे.

या ग्रंथात सूरदासांचा प्रभाव जाणवतो सूरसागरांतील अनेक पदांतील भाव, कोठे कोठे तेच शब्द आणि तेच चरण गीतावलीत आढळतात. तुलसीदासांनी सूरदासांची पदें ऐकली वा वाचली होती आणि त्यांतील रचनेवरूनच त्यांनी 'गीतावली' रचली असावी. तुलसीदासांच्या ग्रंथात 'गीतावली'चे स्थान महत्त्वाचे आहे. संगीताचे ग्राम, सुर आणि सम वगैरे बरोबर स्वरांतील आरोह अवरोहाचे उज्ज्वल रूप दिसून येते. लयाच्या तरलतेमुळे संगीतकला आणि काव्यकला यांच्या अपूर्व संगमाने एकप्रकारें मणिकांचन योगच साधला आहे. त्यास शैली, चित्, समास शैली तसेच शब्दांत ध्वनि आणि गुण यांच्या दृष्टीने सामंजस्य दिसून येते. प्रायः रूपक आणि उपमा यांचा विलास आढळतो.

श्रृंगार आणि वात्सल्याचे चित्रणानें तुलसीदासांनी यांत अपूर्व रंग भरला आहे. बाललीलांच्या वर्णनांत शब्दांची निवड इतकी अचूक आहे की नूपुरयुक्त बालकांच्या गतिमान चरणांचा, तसेच बालकांच्या मधुर बोबड्या बोलांचा ध्वनी ऐकूं येतो. बालरूपाच्या अतुलनीय वर्णनांत माधुर्य आणि प्रसाद भरून राहिला आहे. योग्य स्थळी करुणरस आणि ओज यांचेही उत्तम दर्शन घडते. चित्रकूट प्रकृति चित्रण अत्यंत मनोहारी आहे. थोडक्यांत रस-परिपाक, भाव प्रकाशन, गुण-नियोजन, वृत्त-व्यंजना-अलंकार-विधान, भाषा-सौष्ठव एवं गीतिकाव्यत्व या दृष्टीने या ग्रंथास साहित्यांत श्रेष्ठ स्थान लाभले आहे.

## कृष्णागीतावली

हा व्रजभाषेंतील ग्रंथ असून गोस्वामींच्या गेय ग्रंथांत यास तिसरे स्थान आहे. प्रथम विनयपत्रिका २) गीतावली आणि ३) कृष्णगीतावली. यांतील पदसंख्या एकुण ६१ असून बिलावल, आसावरी, केदारा, गौरी मल्हार, नट, कान्हरा, धनाश्री आणि सोरठ रागांत रचना केली आहे. हे एक मुक्तक काव्य असून श्रीकृष्णाच्या बाललीलांपासून तो उद्धव संवादापर्यंतच्या काही घटनांचे सूक्ष्मतम वर्णन यांत केले आहे. पहिली ८ पदें यांत गोकुळांतील बाललीलांचे वर्णन असून पुढील ९ पदें गोपींची तक्रार, गोपींच्या तक्रारीने कंटाळून यशोदा कृष्णास उखळास बांधते येथवर वर्णन आहे. १८ व्या पदांत इंद्राचा व्रजावर कोप, १९ व्या पदांत गोपाळकाला तर २०व्या पदांत मुरलीधर कृष्णाचे सुंदर रूप वर्णन आहे. २२ पदांपर्यंत स्तुति वगैरे व २३ ते ३२ पदांत गोपींच्या विरहाचे वर्णन आले आहे. पद ५९,वे यांत उद्धव - गोपी संवाद असून शेवटच्या २ पदांत द्रौपदी वस्त्रहरणाच्या वेळी केलेल्या लज्जा रक्षणाचे मार्मिक चित्रण आहे. श्रीकृष्ण लीला गायन हाच मुख्य उद्देश आहे.

गोस्वामी तुलसीदास हे निःपक्षपाती आणि समन्वयवादी कवि आहेत. त्यांनी सर्व शैलींत रचना केली असून त्यांच्या काव्यांत ज्ञान, भक्ति, कर्म यांचा समन्वय, शैव वैष्णव समन्वय तसेच राम आणि कृष्ण भक्तीचा समन्वय आढळतो. त्यामुळे रामाबरोबर त्यांनी कृष्णलीलाचेही वर्णन केले.

सूरदास आणि तुलसीदास यांची भेट संवत् १६१६ च्या प्रारंभी कामदागिरीजवळ झाली

होती असे मानतात. संवत् १६५९ सुमारास तुलसीदास स्वतः नंददासांना भेटण्यास गेले होते इत्यादि घटनांवरून तुलसीदासांचा कृष्णभक्तांशी संपर्क होता हे निश्चित! सूरदासांच्या रचनेचा अत्याधिक प्रभाव दिसून येतो. अनेक पदे जशीच्या तशी किंवा तेच शब्द किंवा भाव गीतावलीतही दिसून येतात. 'कृष्णगीतावली' वर विशेष प्रभाव पडला असून काव्यपहरणाचा दोष लागावा इतक्या प्रमाणांत साम्य आढळते. सूरदासांची पदे गोस्वामींना मुखोद्‌गत असावी. रामभक्त आणि कृष्णभक्त यांत पारस्परिक सद्‌भावना आणि सामंजस्य नेहमी असावे. सूरदासांनी सूरसागर मध्ये नवम स्कंधांत रामकथा वर्णिली आहेच.

१) गीतावलीत अनेक प्रसंगाचा अनावश्यक विस्तार दिसतो. कृष्णगीतावलीत एकाही प्रसंगात अनावश्यक विस्तार नाही.

२) गीतावलीत काही प्रसंग अगदीं सुटले आहेत. उदा. सुग्रीव-मैत्री, रावण-वध, सीता मिलन इत्यादि. कृष्णगीतावलीत ६० गीतांत संपूर्ण कृष्णकथा सुंदर रीतिने वर्णिली आहे.

३) गीतावलीत काव्यात्मकतेचा प्रभाव अधिक आहे. कृष्ण- गीतावलींत कथात्मक विस्तारांनी काव्यात्मकतेस बाधा कोठेही आलेली नाही. कृष्ण-गीतावलींत कलात्मकता अधिक आहे त्यामुळे श्री. माताप्रसाद गुप्ता म्हणतात कृष्णगीतावली नंतर रचली असावी. डॉ. विमलकुमार जैन यांच्या मते गीतावली अधिक सरस असून तिची रचना संवत् १६५५ मध्ये व कृष्णगीतावली संवत् १६६० मध्ये रचली असावी गोस्वामींची वृध्दावस्था असावी. कवितावलीची रचना सन १६५६ ते १६६० मध्ये धीरे धीरे (क्रमाक्रमाने) झाली असावी त्याताल प्रारंभिक पदावरही सूरदासांचा प्रभाव जाणवतो. सन १६६० च्या आसपास सूरदासांचा प्रभाव दिसून येतो.

**सूर सागर आणि कृष्ण गीतावली :-** अनेक ठिकानी शब्द आणि भावसाम्य असून कृष्णगीतावलीचे ३३वे पदाचे सूरसागरातील पदाशी अत्यंत साम्य असून ते जवळ जवळ जसेच्या तसे घेतले असावे "ऊधो तुम व्रज की दसा बिचारो "

ता पाछे यह सिध्दी आपनी जोगकथा विस्तारो (सूरसागर)

"ऊधो या वृजकी दसा बिचारो"

ता पाछे यह सिध्दी आपनी जोग कथा विस्तारो -(कृष्णगीतावली)

**काव्यत्व :-** व्रजभाषेतील गीतिकाव्य -काव्यकला मध्यम प्रतीची - वात्सल्य आणि वियोग शृंगाराचे वर्णन असून अलंकार अगदी तुरळक आहेत. सूरसागराचा प्रभाव असला तरी तुलसीदास सूरदासांपेक्षा अधिक संयत आहेत. रचना शुद्ध व्रजभाषेंत असून छोटी पण ललित, आणि भाषा आणि शैलीने प्रौढ आहे. थोड्या कालावधीत रचना झाली असावी. पुनरावृत्ती फारशी नाही.

## विनय-पत्रिका

भक्तियोगाचे वर्णन करणारा सर्व श्रेष्ठ ग्रंथ असून या पावन भक्ति भागीरथींत लक्ष लक्ष संतांचा मनोमल धुतला गेला असून असंख्य संसारीजनांना या ग्रंथाने शांति प्रदान केली

आहे. भक्त मरालांना मोत्याचा चारा पुरविला आहे. मानसानंतर दुसऱ्या क्रमांकाचा ग्रंथ असून भक्तिच्या दृष्टीने अनुपमेय असल्याने यास 'भक्तोंका कण्ठहार' असे म्हटले जाते. तुलसीदासांनी सर्व प्रचलित शैलीत रामगुण गायले असा यात उल्लेख असून पदशैलींतील गीतावली, कृष्णगीतावली, आणि 'विनयपत्रिका' या तिन्ही ग्रंथात हा श्रेष्ठ आहे. हे तिन्ही व्रजभाषेंतील असून सूरदासांचा प्रभाव जाणवतो.

यांत २७९ पदें आहेत. बिलावल, धनाश्री, रामकली वगैरे जवळ जवळ २२/२३ रागांचा प्रयोग केला आहे. विनयपत्रिकेची निर्मिती मुक्तक रूपांत म्हणजे स्फुट रूपांत असली तरी पत्रिका असल्याने त्यांत एक क्रम दिसून येतो. कथातारतम्याच्या दृष्टीने हे खंडकाव्य नाही पण यांत खंडकाव्याचा आभास होतो. कलिकाळांने त्रस्त तुलसीदासांनी श्रीरामास ही विनयपत्रिका सादर केली आहे. जगाचे शासक श्रीरामचंद्र, पत्रिका घेऊन त्यांच्या पर्यंत जाणे कसे शक्य आहे? म्हणून ग्रंथारंभी श्रीरामांच्या आज्ञाधारक देवतांची स्तुति केली आहे.

तुलसीदासांच्या आत्मनिवेदनपर गीतांचा आणि स्तोत्रांचा हा संग्रह आहे. परदेशी विव्दानांनी आत्मनिवेदन विषयक साहित्यांत या ग्रंथास उच्च स्थान दिले आहे.

मंगलाचरणांत श्री लंबोदराची स्तुति असून प्राचीन परिपाठी म्हणून 'स्वस्ति श्री' याने पत्रिकेचा आरंभ केला आहे. दुसऱ्या पदांत भगवान सविता याचे स्तवन असून पद ३ ते १४ भगवान् शंकरांची स्तुति आहे. पद १५ व १६ भगवती आदिशक्तीची स्तुति, पद १७ ते २० भगवति भागिरथी स्तुति, पद २१ 'यमुना स्तुति' . पद २२ वाराणशी स्तुति, पद २३, २४ चित्रकूट स्तुति, पद २५ ते ३६ श्री हनुमान स्तुति, लक्ष्मण, भरत आणि शत्रुघ्न स्तुति, पद ३७ ते ४० रामप्रिया जानकी स्तुति, पद ४१ व ४२ संक्षिप्त रामचरित्र वर्णन, ४३ वे पद श्रीरामवंदना, ४४ ते ४८ श्रीहरिशंकरीस्तुति, पद ४९ वे रामस्तुति, ५०, ५१ पदे दशावताराची कथा, पद ५२ श्रीरामाची विविध रूपांत वंदना, ५३ ते ६० पदे बिंदुमाधव स्तुति, ६१, ६२, ६३ मुख्य विषय, पद ६४ ते २७७ पदापर्यंत (यांत प्रभुचे सामर्थ्य प्रभुत्व आणि औदार्य तसेच आपली दीनता, विवशता, पीडा आणि आत्मग्लानी तसेच कलिकालजनित विषमता, यांचे चित्रण केले आहे).

"विनय-पत्रिका 'दीन की, बापु! आपु ही बाँचौ।

हिय हेरि तुलसी लिखी सो सुभाय सही करि बहुरि पूछिए पाँचो॥ "

असे २७७ व्या पदांत ते म्हणतात. रामांना स्वत: ही पत्रिका वाचण्यासाठी त्यांनी प्रार्थना केली आहे. पण लिखित पत्रिका राजारामापर्यंत कोण पोहोंचती करणार? यासाठी त्यांनी हनुमान, आणि भरत यांची रुचि जाणून आणि त्यांच्याकडून संकेत मिळून प्रथम लक्ष्मणांनी भक्त तुलसीची रामचंद्रांजवळ प्रशंसा केली आहे. आणि अन्य दरबारी लोकांचा कल जाणून पत्रिका उपस्थित केली आहे. भगवान रामांनी तिचा सहर्ष स्वीकार केला आहे. याप्रमाणे २७९ पदांत ग्रंथ समाप्ती झाली आहे. यावरून मुक्तक-स्फुट काव्य असले तरी त्यांस एका भाव-सूत्रांत ओवलेले आहे, म्हणून खंडकाव्य नसूनही तसा भास मात्र होतो.

**रचनाकाल :** पूर्व नाम 'राम-गीतावली असून संवत १६६६ ची एक प्रत उपलब्ध आहे पण ती तुलसीलिखित नाही. म्हणजे या काव्याची रचना त्यापूर्वी झालेली आहे. धारावाहिक रूपांत रचना नाही म्हणून संवत १६५५ ते १६६० च्या दरम्यान रचना झाली असावी. पण फार दीर्घ काळ लागला नसावा. कारण यांत एक क्रम आहे आणि सह्य वृद्धावस्थेतील गांभीर्य आणि प्रशान्त भाव सर्वत्र आढळून येतो. संकलन १६६५ सं. मध्ये झाले असावे.

विनयपत्रिकेंत कलियुगवर्णनाच्या निमित्ताने तत्कालीन परिस्थितीचे वर्णन केलेले आढळते. त्याचप्रमाणे तुलसीदासांचे जीवन-दर्शनही अनेक पदांतून आढळून येते (उदा. ७६, २२७, २७५, २७६ वगैरे पहावी. विस्तार भयास्तव पदं देता येत नाहीत)

कलिवर्णनाचा थोडा नमुना पहाः

"आश्रम-बरन-धरम-बिरहित जग, लोक-वेद मरजाद गई है॥

प्रजा पतित पाखंड पापरत अपने अपने रंग रई है॥

सांति सत्य सुभ रीति गई घटि, बढी कुरीति कपट कलई है।

सीदति साधु, साधुता सोचति खल बिलसत हुलसति खलई है॥"

## तुलसी-जीवन दर्शन

'जननी-जनक तज्यो जनमि, करम बिनु बिधिहु सृज्यो अबडेरे॥' पद २२७

"द्वार द्वार दीनता कही काढि रद, परि पाहूँ।

"है दयालु दुनि दस दिसा दुःख-दोष-दलन क्षम कियो न संभाषण काहू॥"(पद २७५)

"कहा न कियो, कहाँ न गयो, सीस काहि न नायो?

राम राबरे बिन भये जन जनमि जनमि जग दुःख दसहु दिसि पायो" (पद २७६)

ही दोन्ही पदे मूळांतून वाचण्यासारखी आहेत. ते म्हणतात, 'आपला भक्त असून दैन्य दुःखाने व्याकुळ होऊन अधम पुरुषांपुढे आपले रडगाणे गात फिरलो, पण कुणी भोजन दिले नाही की अन्न वस्त्र दिले नाही. प्राणाहून श्रेष्ठ प्रतिष्ठेला तिलांजली देऊन दुष्ट पुरुषांसमक्ष आपले रिकामे पोट उघडे करून दाखविले परंतु काहीही मिळाले नाही. हे प्रभु, सत्य सांगतो, क्षुद्र लोभाने मला निर्लज्ज बनवून सर्व प्रकारे नाचविले. माझे कान, डोळे आणि मन सदा विषयलंपट बनलेले आहे. आतां थकून निराश होऊन आणि आपले हित चिंतून मी आपणांस शरण आलो आहे."

भाषा, संगीतात्मकता आणि काव्यत्व या दृष्टीने व्रजभाषेतील अमूल्य ग्रंथ असून यांत पहिल्या ६५ पदांत अधिक तत्सम आणि तद्भव शब्दांचा वापर केला आहे. संस्कृत पदावलींच्या वापरामुळे मधुरता, मनोज्ञता आणि सरसता आली आहे. मात्र "कादंबरी" प्रमाणे क्लिष्टता आणि श्लिष्टता नाही. आपल्या आराध्य देवतेचे गुणवर्णन साग्रसंगीत व्हावे. त्यात उणीव त्रुटि राहू नये हा हेतू असावा. समास शैलीचा वापर केला असून अरबी, फारसी, बुंदेलखंडी शब्दांचा वापर केल्याचे दिसून येते.

"गाना और रोना सभी जानते है" असे म्हटले जाते कारण या मानवाच्या सहज प्रवृत्ती आहेत. भावतरंगास गाण्यांतून वाट मिळते. भावप्रकाशनासाठी संगीत माध्यम सहाय्यकारी बनते. गोस्वामीनी या ग्रंथात अनेक रागारागिणींचा प्रयोग केल्याने संगीताची अलौकिक छटा या संपूर्ण ग्रंथात दृग्गोचर होते. संगीतात जेवढी तल्लीनता असते तेवढी कवितेत किंवा गद्यात्मक वचनांत असत नाही. संत संकीर्तनास म्हणूनच महत्व देतात. म्हणूनच स्तोत्रे, आरत्या यांची रचनाही गेय छंदातून झाल्याचे आढळून येते. विनयपत्रिकेत संगीत आणि काव्याचे चारुतम मिश्रण आढळून येते. शांतरसाचा उत्तम परिपाक दिसून येतो. तसेच उक्ति वैचित्र्य, उपालंभ, व्यंग, दृष्टांत यांची पराकाष्ठा झाली असून विरक्ति आणि अनुरक्तिचे अद्‌भूत सामंजस्य या ग्रंथात आढळते. उपालंभ गर्भित धृष्टता, सलगी आणि व्यंजना या द्वारे सुंदर भाव प्रगट झाले आहेत. उदाहरणार्थ 'हरि तुम बहुत अनुग्रह कीन्हौ। साधन धाम विबुध- दुरलभ तनु मोहि कृपा करि दीन्हौ॥ आणि तरीहि 'तदपि नाथ कछु और मागिहौ 'दीजे परम उदार ॥ " तसेच 'केसब, कारन कौन गुसाई ।' जेहि अपराध असाधु जानि मोहि तजेहु अग्य की नाई ॥ इत्यादि अनेक आहेत. नामदेवांप्रमाणे 'तू पतित पावन होत नाहीस म्हणून तुझ्या आता नामाचा पुतळा बांधून फिरतो, लोकांना सांगतो की तू खोटा आहेस, माझ्या कामना तू पुऱ्या केल्या नाहीस" इत्यादि उद्‌गार लक्षणीय आहेत.

या ग्रंथात भगवंताचे गुणगान, त्याचा महिमा आणि स्वतःची दीनता आणि प्रभूंनी उद्धार करावा अशी तळमळ यांवर लक्ष केंद्रित केले आहे. सर्व साधनांपेक्षा रामनामावर अधिक भरवंसा असून रामनाम हेच मातापिता, सुजन, सनेही, गुरु, साहिब, सखा, सहृदय सर्व कांही असल्याचे गोस्वामी तुलसीदास सांगतात. हेतुरहित भगवत् प्रेमाची वृद्धि व्हावी हीच त्यांची एकमात्र आस आहे.

## पत्रिकेतील भक्ति-पद्धति

तुलसीदास एक महान तत्त्वदर्शी आणि गंभीर विचारवंत होते. सर्वत्र एक उदार आणि व्यापक दृष्टिकोन दिसून येतो. सर्व देवतांचा समन्वय एका रामरूपात केला आहे.

'हरिहि हरिता, बिधिहि विधिता, सिवहि सिवता जो दई।

सोइ जानकीपति मधुर मूरति, मोदमय मंगल मई॥

शिव विष्णु अभेदाचे प्रतिपादन सर्वत्र आढळते. सर्व देवरूप आणि सर्वदेववंद्य राम हेच त्यांचे उपास्य दैवत प्रत्यक्षतः आणि परोक्षतः तुलसीदासांना पूज्य आहेत. निर्गुण तेच सगुण होतात. ग्रंथात सगुण- निर्गुण, ज्ञान आणि भक्ति यांचा समन्वय साधला आहे. ज्ञानांत विरति असते तर भक्तित रति असते. वेदांचा एकेश्वरवाद ग्रहण करून रामानाच सर्वरूप जाणले आहे.

तुलसीदास, स्वामी रामानंदाच्या शिष्य परंपरेतील आणि रामानंद विशिष्टाद्वैती असे मानले जाते, त्यामुळे त्यांच्या मताचा प्रभाव जाणवतो. ब्रम्हास निर्गुण म्हणूनही सगुण म्हटले आहे. भक्तिसाठी द्वैत आवश्यक आहे. तुलसीदासांनी माया म्हणजे संसाराची निस्सारता असे म्हटले असून तिला मिथ्या म्हटलेले नाही. पण त्याचवेळी 'सीताराम मय सब जग जानी'

यांत अद्वैत सिद्धांतच दिसून येतो. जीवास संसारातून मुक्त होऊन ब्रह्मरूप होण्यासाठी सोपा मार्ग भक्ति आहे. 'अहं ब्रह्मास्मि' अथवा 'सोऽहम्' असे न म्हणता भगवंताशी अनेक नाती मानली आहेत.

"बहुत नात रघुनाथ तोहि मोहि, अब न तजे बनि आवै।

जनक-जननि गुरु बंधु सुहृद, पति सब प्रकार हितकारी॥

द्वैतरूप तम-कूप परौं नहि, अस कछु जतन बिचारी॥"

वैष्णव अथवा भागवत धर्म पद्धतिनुसार भक्तिच्या सात भूमिका आहेत. १) दीनता, २) मानमर्षता, ३) भयदर्शन, ४) भर्त्सना, ५) आश्वासन, ६) मनोराज्य आणि ७) विचारणा या सर्वांचे समग्र दर्शन विनयपत्रिकेत घडते.

'सुनु मन मूढ सिखावन मेरो' - 'ऐसी मूढता या मनकी' इत्यादि पदें पहावी. (रामदासांच्या 'मनोबोधा' शीं साम्य जाणवतें. अशी अनेक पदें आहेत).

मन हे अति चंचल आणि दुर्जय आहे. मनाच्या विषयासक्तिमुळे कामादि विकार उत्पन्न होतात. भक्तिसाठी षड्विकारांच्या त्यागाची आवश्यकता आहे. कारण हे विकार आहेत तोपर्यंत आत्मदर्शन होणार नाही. जोपर्यंत हे विकार दूर होत नाहीत, जीवाची संसारासक्ती वाढत असते, त्या आसक्तीमुळे दुर्निवार भ्रम होतो-भ्रमवश जीव, बाल, युवा, वृद्ध अवस्थेत नाना आसक्तींना वश होऊन सत्, असत्, कर्म करीत राहतो आणि अधिकाधिक बद्ध होतो.

भगवंताचा अनुग्रह झाला तरच मोहमायेमुळे उत्पन्न झालेला भ्रम दूर होतो. भ्रम नष्ट झाला की कामादि नष्ट होतात आणि जीवास मोक्षाची इच्छा होऊ लागले. त्याच्या ठिकाणी क्षमा, दया, दाक्षिण्य ही धर्मलक्षणे दिसू लागतात. त्याच्या ठिकाणी विनम्रता येते, आपल्या मूर्खपणाबद्दल पश्चात्ताप होऊन तो दैन्याची प्रतिमूर्ती होऊन भगवंताच्या कृपेची याचना करूं लागतो.

'मो सम मंद न कोउ', 'अबलौं नसानी, अब न नसे हौं'

'रामकृपा भवनिसा सिरानी, जागे पुनि न डसे हौं॥"

'भयेहुं उदास राम, मेरे आस रावरी, कहाँ जाऊँ, कासौं कहौं को सुनै दीन की। त्रिभुवन तुम्ही सब अंगहीनकी" अशी स्थिति झाली की तो सुख-दुःख, मानापमान समान मानू लागतो, त्याला अनुरक्तिवश दिवसरात्र सारखी वाटूं लागतात, रात्री जीव झोपतात तेव्हां हा जागा असतो.

'जेहि निसि सकल जीव सूतहिं तव कृपा पात्र जन जागै।"

तुलसीदासांच्या मतानें भवसागर पार करून रामप्राप्ति होण्यास योग, यज्ञ, व्रत, संयम आदि सर्व साधने भक्तिपेक्षां तुच्छ आहेत.

'जौं बिनु जोग, जग्य, व्रत संयम गयो चहै भव-पारहि।

तौ जनि तुलसीदास निसिबासर हरि-पद-कमल-बिसारहि॥

वैष्णव भक्ति पद्धतिस अनुसरून शरणागतिचे ६ नियम आहेत. १) अनुकूल गुणांचा संकल्प, २) प्रतिकूल गुणांचा त्याग, ३) इष्टदेव द्वारा रक्षित होण्याचे आश्वासन, ४) गोप्तृत्वाचे वर्णन, ५) आत्मविक्षेप आणि ६) कार्पण्य. या सर्वांचे दर्शन विनयपत्रिकेत घडते.

तुलसीदासांनी 'रघुपति भगति करत कठिनाई' असे म्हणून भक्ति प्राप्ति फार कठीण आहे असेही सांगितले आहे. ही भक्ति केवळ रामानुग्रहानेच प्राप्त होते. स्वामी वल्लभाचार्य यांनीही असेच म्हटले आहे. म्हणून रामकृपाही भक्तिहून श्रेष्ठ आहे. ('भक्त म्हणवितां गोड वाटे। परि ते हृदय फुटे ॥ ' असे एकनाथ महाराजही म्हणतात.) 'भक्ति ही सुळावरची पोळी' - तुकोबा.

'ग्यान भक्ति साधन अनेक सब सत्य, झूठ कछु नाही।

तुलसिदास हरिकृपा मिटै भ्रम, यह भरोस मन माही ॥ "

रामकृपा होण्यासाठी तुलसीदास शुद्ध भावाने राम नामाचा जप हेच सर्वश्रेष्ठ मानतात. रामचंद्रांच्या औदार्याचा उल्लेख अनेक पदांत आला आहे. 'ऐसे को उदार जग माही। बिनु सेवा जो द्रवहिं दीन पर राम सरिस कोउ नाही ॥ " "जानत प्रीति-रीति रघुराई। नाते सब हाते करि राखत, राम सनेह सगाई ॥ " "ऐसे राम दीन हितकारी। अति कोमल करुना निधान बिनु कारन पर-उपकारी ॥ "

गोस्वामींना राम इतके प्रिय आहेत की निःस्वार्थ रामपदी अनुरागाखेरीज इतर ते कांहीही मागत नाहीत.

'चहों न सुगति, सुमति, संपति कछु, रिधि सिधि बिपुल बडाई।

हेतु-रहित अनुराग राम-पद बढै अनुदिन अधिकाई ॥ "

रामांच्या नात्यांनी इतर नाती ते मानतात.

'नाते नेह राम के मानियत सुहृद सुसेव्य जहाँ तो। '

"राम राम रटु राम राम रटु, राम राम जपु जीहा। "

रामनाम नवनेह, मेहको, मन! हठि होहि पपीहा ॥ "

"राम जपु, राम जपु, राम जपु बावरे।

घोर भव-नीरनिधि नाम निज नाव रे ॥ "

**याप्रमाणे** या ग्रंथात **भक्ति**रसाचा पूर्ण परिपाक असून हिंदी साहित्यांतील या ग्रंथात **भक्तिभावना** आणि धर्मपरता यांचा नित्य संबंध वर्णिला आहे. 'जिसे राम प्रिय नही उसे धर्म प्रिय नही'. शास्त्र संमत नियमाचे पालन, अनन्य प्रेम, प्रभुवर अनन्य निष्ठा ही यांतील भक्तिपद्धतिची विशेषता आहे. रामनामजप संकीर्तन याने रामकृपा होते, त्यामुळे देहजनित विकार नष्ट होऊन, आत्मस्वरूप प्रकट करणारी आणि रामचरणी अनुराग देणारी सत्संगति प्राप्त होते. तिने भक्तिप्राप्त होते आणि भक्तीने भवभय आणि तापत्रय विनाश होऊन परम शांतीचा लाभ होतो. सत्संगतिचे महत्त्व फार आहे. गोस्वामी म्हणतात.

"बिनु सतसंग भक्ति नहिं होई। ते तब मिलै द्रवै जब सांई॥"

"जब द्रवै दीनदयालु राघव साधु संगति पाईए॥"

## दोहावली

**रचनाकाल :** यांत रूद्रबीसीचा उल्लेख मिळतो.

'अपनी बीसी आपुही पुरिहि लगाये हाथ।

केहि बिधि बिनति विश्व की करौ विश्व के नाथ॥

रूद्रबीसी कविच्या जीवनांत दोनदां आली. एकदां संवत १५९६ ते १६१६ पर्यंत आणि पुन्हां संवत १६५६ ते १६७६ पर्यंत या ग्रंथाचे संकलन दुसऱ्या रूद्रबीसीच्या मध्यांत झाले असावे कारण गोस्वामी वृद्ध असल्याचा उल्लेख मिळतो.

"रोग निकर तनु जरठेपनु, तुलसी संग कुलोग।

राम कृपा लै पालिए दीन पालिबे जोग ॥१७८ दोहा॥

कविला बाहुपीडाही झाली होती म्हणून पीडाशमनार्थ त्यांनी हनुमान - बाहुकची रचना केली. बाहुक एक प्रकारे कवितावलीचे (कवितावली) परिशिष्ट असून कवितावलीत रूद्रबीसी आणि मीनेचा शनि असल्याचा उल्लेख आहे. त्यामुळे ती कृतिही वृद्धावस्थेतील आहे हे 'कवितावली'च्या रचना काळात सिद्ध केले आहे. दोहावलींतही बाहुपीडा शमनार्थ तीन दोहे आलेले आहेत.

'तुलसी-तनु सर, सुख-जलज, भुज-रुज-गज बरजोर।

दलत दयानिधि देखिए कपिकेसरी किशोर॥

भुज-तरु कोटर रोग अहि बरबस कियौ प्रवेस।

बिहंगराज - बाहन तुरत काढिय मिटइ कलेस॥

बाहु-बिटप, सुख-बिहँग-थलु लगी कुपीर कुआगि।

रामकृपाजल सींचिये, बेगि दीन-हित लागी॥ (दोहावली २३४, २३५, २३६)

दोहावलीचा प्रथम दोहा रामाज्ञा-प्रश्न आणि वैराग्य-संदीपनि दोन्हीत आरंभी आला आहे. सर्वाधिक दोहे मानसांतून घेतलेले आहेत. एकूण ५२ दोहे मानसांतिल आहेत. हा एक संग्रह ग्रंथ असून इतर ग्रंथांतील दोहे, सोरठे सोडतां इतर रचना कविची स्वतंत्र रचना आहे.

## कवितावली

कवितावली हा व्रजभाषेंतील सप्तकाण्डात्मक महत्त्वपूर्व ग्रंथ आहे. कांडांचे नामकरण मानसाप्रमाणेंच असून बालकांडात २२, अयोध्याकांडात २८, अरण्यकांडात १, किष्किंधा १, सुंदरकांडात ३२ आणि लंकाकांडात ५८ छंद आहेत. उत्तरकांड सर्वांत मोठे असून त्यांत १८३ छंद आहेत, म्हणजे इतर सर्व कांडे मिळून जी रचना आहे त्याहून ४१ छंद अधिक याप्रमाणे एकूण ३२५ छंद आहेत. हनुमान बाहुक परिशिष्ट असे धरले तर ४४ छंद आणखी

वाढतात. हे प्रबंध काव्य नाही तसेच श्रृंखलाबद्ध तारतम्य कथेच्या संघटनेत नाही. तुलसीदास समन्वयवादी प्रतिभावंत कवि होते. त्यांनी ज्ञान, कर्म, भक्ति यांचा समन्वय साधला, शैवी वैष्णवी भावनेचा समन्वय साधला, तसाच तत्कालीन प्रमुख भाषा व काव्यशैलींचा समन्वय साधला. यांत व्रज आणि अवधी समन्वय साधला आहे. त्यांच्या काळांतील ५ प्रमुख रचना प्रणालीत त्यांनी रचना केल्याचे मागे आपण पाहिलेच आहे. या ग्रंथात सवैया, कवित्त एवं छप्पय आदि काही छंदांचा उपयोग केला आहे. हा भाट पद्धतीच्या अनुकरणाचा परिणाम आहे. कवितावली ही भाट आणि बंदीजन यांच्या साठींच मुक्तक स्वरूपांत रचली केली. पूर्वी कवित्त, छप्पय आणि सवैया या छंदाना 'कवित' अशीच 'सामान्यसंज्ञा' होती.

## कथासूत्र

प्रारंभी ७ सवायांत बाल रामाचे वर्णन आहे.

१) **बालकांड** - नंतर एकदम-सीतास्वयंवराचे वर्णन असून नंतर परशुराम प्रसंग आहे. पण परशुराम-लक्ष्मण संवाद नाही.

२) **अयोध्याकांड** - वरात आणि राज्याभिषेक वर्णन नाही, मंथरा- कैकेयी, कैकेयी-दशरथ संवाद नाहीत. एकदम राम वनवासास निघाल्याचे वर्णन आहे. - गंगातटाकी केवट-प्रसंग, तसेच ग्रामवधूशीं सीतेचा वार्तालाप, आणि राम सीता लक्ष्मण पथिक रूपाचे वर्णन आहे.

३) **अरण्यकांड** - फक्त १ सवायांत पंचवटी प्रसंगाचे वर्णन आहे.

४) **किष्किंधाकांड** - १ कवित - पंचवटीहून पुढे राम-गमन वर्णन नाही, मुनि समागम नाही, हनुमान द्वारा समुद्र लंघिला त्याचे वर्णन आहे.

५) **सुंदरकांड** - सीता-दर्शन- हनुमानद्वारा वाटिका विध्वंस, आणि लंकादहन यांचे अत्यंत ओजपूर्ण, भयानक आणि विस्तृत वर्णन आहे.

६) **लंकाकांड** - यांत अंगद-रावण संवाद, तसेच रावण-मंदोदरी संवाद असून यांत रोचकता आहे. तसेच थोड्या छंदात सपरिवार रावण वध वर्णन आहे.

७) **उत्तरकांड** - हे मोठे असून यांत रामजीवनांतील घटनांचे वर्णन नाही. रामगुणांचे आणि नाममाहात्म्याचे वर्णन आहे. तसेच तुलसीदासांचे चरित्र, त्यांची दैन्यावस्था, देशाची दुरवस्था यांचे चित्रण आहे. शिवस्तुति, गंगा-प्रयाग स्तुति, काशी, चित्रकूट आदिचे वर्णन, मध्येच एक भ्रमर गीत (१३३ ते १३५ छंद) १४३ व्या छंदांत वणव्याचे वर्णन, १८० व्या छंदात क्षेमकरीचे वर्णन आदि आले आहे. या कांडाचा राम कथेशी संबंध नाही. या गोष्टींवरून हा ग्रंथ प्रबंधरूपाने लिहिला गेला नसून भिन्न समयी भिन्न अंश निर्माण झाले आणि कालांतराने संग्रहित केले गेले असे स्पष्ट जाणवते.

**रूद्रबीसी** - म्हणजे रूद्रविंशति बार्हस्पत्य वर्षप्रणालीच्या अंतिम २० वर्षांना म्हणतात. तुलसीदासांच्या आयुष्यांत दोनदां रुद्रबीसी आली. प्रथम संवत् १५९६ ते १६१६ नंतर संवत् १६५६ ते १६७६. मीन लग्नांत शनिचा प्रवेशही कविच्या जीवनांत दोनदां मानला

गेला आहे. प्रथम चैत्र शुक्ल पंचमी संवत् १६४० ते सं. १६४२ च्या ज्येष्ठापर्यंत आणि दुसऱ्यांदा चैत्र शुक्ल द्वितीया सं. १६६९ ते ज्येष्ठ संवत् १६७१ पर्यंत.

श्री. स्मिथ यांच्या म्हणण्यानुसार संवत् १६७३ मध्ये प्रारंभ होऊन महामारी आठ वर्षे राहिली... गोस्वामींचा निधनकाल संवत् १६८० हा निश्चित आहे. अंतीम वर्षांत या ग्रंथाची रचना केली असावी म्हणून महामारीचा उल्लेख आहे.

भाटांच्या गानार्थ ग्रंथ रचला. अंशाअंशाने रचना झाली आहे. सर्व ग्रंथात रामाच्या सगुण रूपाचे वर्णन विशेषत्वाने आले आहे. रसपरिपाक, ध्वनि, अलंकार, रसाभिव्यक्ती या दृष्टीने उत्तम ग्रंथ आहे. सर्व रसांचे चित्रण पण मुख्यतः वीररस अधिक आहे. श्रृंगाररस, हास्यरस, करुणरस लक्षणीय आहेत.

'पुर ते निकसी, रघुवीर बधू, धरि धीर दये मग में डग द्वै । झलकी भरि भाल कनी जल की, पुर सुखि गए मधुराधर वै ॥ फिरी बूझति है चलनौ अब केतिक। पर्णकुटी करिहै। कित छै॥ तिय की लखि आतुरता पिय की आँखियाँ अति चारु चली जल च्वै॥ जर धीरोदात्त रामांच्या ही नेत्रांत अश्रु उभे राहिले तर वाचकांची दशा काय होणार? संयमित श्रृंगार आणि करुणरसाचे सुंदर चित्रण आहे. लंकाकांडात वीर, रौद्र, भयानक, बीभत्स यांचे, उत्तरकांडांत शांतरसाचे तर बालकांडात वात्सल्याचे मनोहर चित्रण आढळते.

ध्वनिला काव्याचा आत्मा मानतात. तुलसीदासांच्या या काव्यांत व्यंजनेचे प्राधान्य असून केवट प्रसंग चित्ताकर्षक झाला आहे.

'परसे पग धूरि तरै तरनी, धरनी घर क्यों समुझाइ हौ जू॥ मूळांतूनच पहावे.

व्रजभाषेचे 'निखरा हुआ स्वरूप' या ग्रंथात दिसून येते, शब्दांची मोड तोड केलेली नाही. क्वचित खडी बोली आढळते. अरबी, फारसी, तुर्की, बँगला, मारवाडी, बुंदेलखंडी इत्यादि भाषेतिल शब्दही आढळतात. संस्कृतचे प्राचुर्य असून भाषा रसानुकूल आहे. या ग्रंथात सवैया, कवित्त, घनाक्षरी, झूलना आणि छप्पय हे छंद वापरले असून लोकोक्ति आणि मुहावरें यांचाही भरपूर उपयोग केला आहे. कवितावलीतील लंकादहन वर्णन आणि कवि भूषणद्वारा लिखित 'शिवा-बावनी' यांत भाषा आणि भाव साम्य आढळते.

या ग्रंथात उत्तरकांडात तत्कालीन परिस्थितीवर प्रकाश टाकणारा भाग अधिक आला आहे. छंद ७९, ८१, ८३, ८४, ८५, ८६, ९६ ते ९९, ११६ वगैरे बघण्यासारखे आहेत.

## तुलसी लिखित पंचनामा

या पंचनाम्यांत पहिल्या ६ पंक्ति काव्यांत असून प्रथम आणि अंतिम दोन ओळी संस्कृत श्लोक व मध्ये १ दोहा आहे. नंतर गद्य आहे.

"श्रीजानकीवल्लभो विजयते"

द्विश्शरं नाभिसंधत्ते द्विस्स्थापयति नाश्रितान्।

द्विर्ददाति न चार्थिभ्यो रामो द्विर्नैव भाषते ॥१॥

तुलसी जान्यो दसरथहि धरमु न सत्य समान।

रामु तजो जेहि लागि बिनु राम परिहरि प्रान ॥ २ ॥

धर्मो जयति नाधर्मस्सत्यं जयति नानृतम्।

क्षमा जयति न क्रोधो विष्णुर्जयति नासुरः ॥ ३ ॥

## श्री परमेश्वर

संवत १६६९ समये कुशार सुदि तेरसी बार सुभ दिने लिषीते पत्र आनंदराम तथा कन्हईके अंश विभाग पुर्वसु आगैं जे आग्य दुनहु जने मागा जे आग्य भै शे प्रमान माना दुनहु जने विदित तफसीलु अंश टोडर मलुॅ के माह जे विभाग यदु होत रा असे लिहून त्या पुढे 'अंश अनंदराम' 'अंश कन्हई' असे भाग पाडून तपशील देऊन खाली अनेक साक्षींची नांवे लिहिलेली आहेत.

तुलसीदास महान पंडित, सांसारिक व्यवहारांत तरबेज, कथावाचक, होते, जन्मपत्रिका वगैरेही बनवित असत. इकडे तिकडे पत्रव्यवहारही करीत म्हणून हा समस्त पंचनामा तुलसीलिखितच असावा असे मानले जाते.

## श्रीरामचरित मानस

गोस्वामींच्या सर्व ग्रंथात हा प्रमुख ग्रंथ आहे. सर्व समाजाच्या हृदयात पवित्र प्रेरणा निर्माण करणारा हा ग्रंथ म्हणजे कलियुगातील रामावतारच असून भारतास अभिमान वाटावा असे हे अक्षरवाङ्मय आहे. याची रचना वि.सं. १६३१ ते वि.सं. १६३३ या काळात झाली आहे. सप्तकांडात्मक रचना असून त्यांना सप्त सोपान म्हटले आहे. मुख्यतः दोहा आणि चौपाई यांचा उपयोग केला असून मध्ये मध्ये इतर छंदही आहेत. दोह्यांची एकूण संख्या १०७४ आहे. ग्रंथाची भाषा मुख्यतः अवधी असून संस्कृत तत्सम, तद्भव शब्द खूपच वापरले आहेत. इतर अनेक भाषांतील शब्दही प्रसंगोपात आले आहेत. तुलसीदास भक्त कवी असल्याने त्यांनी आपले इष्ट दैवत मर्यादा पुरुषोत्तम रामचंद्र यांचे चरित्र गायिले आहे. त्यात एवढेच नव्हे तर सर्वच साहित्यात गेयता भरपूर आहे. हे तसेच समस्त वाङ्मयीन निर्मिती मानवतेच्या उच्चतम आदर्शांची आणि मूल्यांची निर्देशक आहे.

'मानसा'त स्नान करून आतापर्यंत असंख्य लोक समाधान पावले. काक आणि बक, पिक आणि हंस झाले. या शक्तिशाली ग्रंथाच्या वाचनाने, वाचणारा (वाचक) प्रभावित झाल्याखेरीज रहातच नाही. त्यांतील सुभाषिते, 'पदावली' वेदवाक्याप्रमाणे समाजात प्रचलित आहेत. यातील साहित्यिक सौंदर्य असे आहे की अडाणी, अज्ञानी लोकांना तो ग्रंथ अत्यंत साधा, सोपा, आकर्षक वाटतो; तर विद्वानांना तो अतिगूढ वाटतो त्यामुळे सर्वांनाच त्याची मोहिनी पडते, सर्वच त्याचा आनंद लुटू शकतात. मानस हे नाट्य महाकाव्य आणि त्याचबरोबर भक्तिशास्त्रही आहे. काव्याच्या आणि भक्तिच्या ताण्याबाण्यांनी हे महावस्त्र विणले असून त्यात नाट्यमयतेचे जरतारी धागे अधिकच शोभून दिसत आहेत.

## विश्वव्यापक गौरव

युगयुगीन ग्रंथरत्न शाश्वत असतात. त्यांचे प्रणेतेही अजरामर यशश्रीने मंडित होतात.

तुलसीदासांची प्रतिभा तसेच साहित्यातून व्यक्त झालेले त्यां[illegible] यांचा [illegible] परिणाम म्हणजे वरील मत होय. त्यांची ख्याती आणि सम[illegible] [illegible]ळू आंतरराष्ट्रीय व्यापकता येत आहे.

श्री ग्राऊज, श्री. एटकिन्स, श्री. फ्रेडरिक पिनकाट यांनी 'मानसा'चा इंग्रजीत अनुवाद केला आहे. तर रशियाचे प्रसिद्ध विद्वान श्री. वारान्निकोव यांनी 'मानसा'चा रशियन भाषेत अनुवाद केला आहे. याशिवाय श्री. एल. पी. टेसीटोरी (इटालियन), डॉ. कुमारी शार्लीत बोदविल (फ्रेंच), बेलजियमचे डॉ. कामिल बुल्के, ऑस्ट्रियाचे श्री. जॉर्ज सिब्रा यांनी आपापल्या भाषेत तसेच डॉ. जे. एन. कारपेंटर, श्री. एच. एच. विल्सन, डॉ. ग्रियर्सन, डॉ. विसेंट स्मिथ व इतर यांनी इंग्रजीत 'तुलसीदास' संबंधी किंवा त्यांच्या 'श्रीरामचरितमानसा' संबंधी अभ्यासपूर्ण शोधकार्य करून साहित्य निर्मिति केली आहे.

## तुलसीदासांची शिकवण

कवीपेक्षांही भक्त म्हणून तुलसीदासांची योग्यता अधिक असून त्यादृष्टीने त्यांचे व्यक्तिमत्त्व अत्यंत विलोभनीय आहे. तुलसीदासांची भक्ती एका विशिष्ट कोटीची आहे. तिचे रूप निश्चित करताना त्यांनी अत्यंत सावधानता बाळगली आहे. त्यांच्या पूर्वीच्या कबीर इत्यादी संतांनी भक्तीच्या व्याख्येत मानसिक प्रेमास प्राधान्य देऊन समस्त आचारांचे, कर्मकांडाचे खंडन केले, वेदपुराणांची निंदा केली, त्यामुळे जनसामान्यास भक्तीसाठी मूर्ती किंवा अवतार सहाय्यक न होता बाधक आहेत असे वाटू लागले. त्यांना 'मायाजनित' मानले जाऊ लागले. 'राम' म्हणजे 'ब्रह्म', रामावतार म्हणजे ब्रह्म नव्हे अशी विचारसरणी प्रसृत झाली. त्या विचारसरणी विरूद्ध लोकमत जागृत करावयाचे होते. तत्कालीन वातावरणातील अवतारासंबंधी निर्माण झालेले संदेहच 'रामचरितमानसा'तील प्राथमिक संवादातून तुलसीदासांनी प्रकट केले आहेत. ज्यांनी ही रामकथा ऐकली नसेल त्यांनी आश्चर्य मानू नये, कारण रामकथेला जगात मिती नाही. कल्पभेदाने हरि चरित्रात भिन्नता येते असे जाणून, संशय न धरता, पूर्वग्रह न ठेवता, प्रेमाने कथा ऐकावी. तीही संतांच्या, अधिकारी वक्त्याच्या मुखाने ऐकावी; ती दीर्घकाळ ऐकली की मनातील सर्व संशय नष्ट होतात. भरद्वाज-याज्ञवल्क्य संवाद, शिव-पार्वती संवाद, गरूड-काकभुशुंडी संवाद यातून सर्वसाधारण माणसाच्या मनात निर्माण होणारे, तत्कालीन एवढेच नव्हे तर सर्वकालीन प्रश्नच उपस्थित केले आहेत. 'रामु कवन प्रभु पुछौ तोही' 'प्रभुसोइराम कि अपर कोऊ, जाहि जपत त्रिपुरारि' 'ब्रह्म जो व्यापक विरज अज अकल अनीह अभेद, सो कि देह धरि होइ नर, जाहि न जानत वेद' इत्यादि प्रश्नांचे उत्तर श्रुतिसंमत असे दिले आहे. 'विप्र धेनु सुर संत हित लीन्ह मनुज अवतार। निज इच्छा निर्मित तनु, माया गुण गोपार॥' याप्रमाणे संशय आणि तर्कांना दूर सारून भक्तीच्या योगे दर्शन आणि धर्म यांना जीवनाचे प्रत्यक्ष अंग बनविण्याचा तुलसीदासांनी प्रयत्न केला. 'निर्गुण रूप सुलभ अति सगुन जान नहि कोइ। सुगम अगम नाना चरित सुनि मुनि मन भ्रम होइ॥ (उत्तरकांड ७३ ख) असे स्वानुभवाने ते सांगत आहेत. भक्तीसंबंधी त्यांचा दृष्टिकोन पूर्वपरंपरेस धरून असूनही, व्यापक आणि व्यावहारिक नवीन प्रेरणांनी युक्त असा आहे. महाराष्ट्रीय संतांच्या दृष्टिकोनात व त्यात विलक्षण साम्य आहे. मनुष्यस्वभावाचे

तुलसीदासांचे ज्ञान किती सखोल आहे याचा प्रत्यय आज चारशे वर्षांनीही येतो. आजही आपल्या मनांत हेच प्रश्न उभे राहात नाहीत का?

## रामाहून रामदासच श्रेष्ठ

मनुष्य जन्माला आल्याचे सार्थक कशाने होते? भगवत् प्रेम हेच खरे म्हणजे आयुष्याचे उद्दिष्ट असावे, कारण त्यानेच विनासायास परमानंद आणि परमपद प्राप्त होते. प्रेमभक्तीही साधनाने मिळत नसून संत वा रामकृपेने, त्यांनी दिली तर मिळते. संतांचे केवळ दर्शनसुद्धा पूर्व पुण्याईने होते, मग दीर्घकाळ सत्संग लाभण्यास तर परम पुण्यसंग्रह, महान्, भाग्यच हवे. संतांची संगती रामकृपेनेच मिळते. रामदर्शनापेक्षाही सत्संगती दुर्लभ आहे. थोडा काळ सत्संग झाला तरी त्या काळात जे सुख मिळते ते स्वर्ग किंवा मोक्षसुखापेक्षाही अधिक असते. जगात त्यासारखे महान् सुख दुसरे नाही. सत्संगाच्या योगे भवसागर सहज पार करता येतो. बराच काळ सत्संग घडला तर त्यांच्या मुखाने विमल हरिकथेचे श्रवण घडते; आणि त्यायोगे मोह, संशय, भ्रम नष्ट होऊन रामचरणी खरा दृढ अनुराग प्राप्त होतो. रामापेक्षा रामदास हे अधिक थोर असून त्यांच्या कृपेनेच रामाची भेट होते. त्यांना त्यांच्या सहज कृपाळू स्वभावामुळे दुसऱ्याचे दुःख पहावत नाही व त्यामुळे त्यांच्यापुढे नम्र होऊन त्यांना शरण गेल्यास ते तात्काळ त्या जीवाचे दुःख दूर करून त्यास शाश्वत सुखाची प्राप्ती करून देतात.

नरदेहासारखा श्रेष्ठ दुसरा देह नाही. त्याची इच्छा देवादिकही करतात. असा दुर्लभ देह मिळून जे विषयांतच दंग होतात, त्यांच्यासारखे अभागी तेच होत. नरदेह मिळाला, रामकृपेने उत्तम सद्गुरूंचा लाभही झाला; असा उत्तम योग जुळून येऊनही जो कुणी भवसागर तरून जाणार नाही तो आत्महत्याराच होय!

'परउपकार वचन मन काया' असा संतांचा स्वभावच असतो. ते स्वतः अमानी असतात पण दुसऱ्यास मात्र सन्मानाने वागवितात. ते निरिच्छ, निस्पृह, सरळ स्वभावाचे, वैराग्य संपन्न, सर्व भूत मात्रांवर प्रेमकरणारे असतात. ते भगवत् नाम परायण असून द्विजपदी त्यांचे प्रेम असते. ते लोकांच्या सुखाने सुखी होतात. दुखाःने दुःखी होतात. अनेक संकटे कोसळली तरी ते कधीही नीतीचा त्याग करीत नाहीत, आपला संयम सोडीत नाहीत, कठोर भाषण करीत नाहीत. त्यांचा सर्वाभूती भगवत्भाव असतो.

## सेवकाचा जीवन धर्म

परहितासारखा दुसरा धर्म नाही, आणि परपीडेसारखे दुसरे पाप नाही. परनिंदा, चाहडी यापासून साधकाने सर्वथा दूर राहावयास हवे. इतर पातके ही गुंजाप्रमाणे असून असत्य हे मात्र पर्वताप्रमाणे आहे. गुंजाचा कधी ढीग होत नाही. अर्थात् असत्त्यासारखे मोठे पातक नाही. सत्यपालनासाठी थोर महात्मे प्रसंगी जीवावरही उदार होतात, पण सत्याचा त्याग करीत नाहीत. प्रत्येकाने निष्काम बुद्धिने आपापल्या वर्णाश्रम धर्मास अनुसरून योग्य ते कर्तव्य चोखपणे करावे. त्यायोगे त्याचे कल्याण होते. स्त्रियांनी पातिव्रत्य धर्माचे पालन करावे. सेवक धर्म हा आचरण्यास अत्यंत कठीण असतो. पण जो कठोर अशा सेवकधर्माचे कसोशीने पालन करतो; त्यास त्याच्या स्वामीपेक्षाही श्रेष्ठत्व प्राप्त होते. भगवत् कृपा

होण्यासाठी भाषादि बाह्य साधनास महत्त्व नाही. भावात्मक खरे प्रेम हवे. प्रेमतत्त्व जाणणे सोपे नाही. तेथे पांडित्याचा उपयोग होत नाही. अडाणी, अशिक्षित असणारेही भगवत्प्रेमरस पान करीत असतील तर भाग्यवान ठरतात. प्रेम हे एक अलौकिक तत्त्व आहे. प्रेमी आणि प्रियतम यांची अनन्यता महत्त्वाची. आपल्या प्रियतमासाठी सर्वस्वाचा त्याग करण्याची तयारी हवी. आत्मसमर्पणाची तयारी हवी. खरा भगवत्प्रेमी सकल संसार निजप्रभुमय पहातो. स्वतःस सेवक समजून सेवेतच धन्यता मानतो. प्रेमभक्तीत चातकासारखी अनन्यता हवी. सर्व साधनांचे एकच फल, ते म्हणजे रामप्रेमप्राप्ती अशी भावना हवी. रामप्रेम करण्यातच आनंद वाटायला हवा. कुठल्याही परिस्थितीत प्रेम करणे सोडता कामा नये. रामप्रेमाशिवाय जगणे ते जगणेच नव्हे अशी भावना हवी.

## धर्माने वैराग्य आणि योगाने ज्ञानप्राप्ती

भगवत्प्रेमप्राप्तीचा साधा सरळ उपाय म्हणजे मनाची, वाणीची आणि कृतीची, अशी त्रिविध सरलता. विषयविमुखता प्राप्त झाल्याशिवाय खरे भगवत्प्रेम उत्पन्न होत नाही. स्वधर्माचरण करीत असता यमनियमांचे पालन केले 'शमयमनियमांचि फुले' आली, तर 'ज्ञानफल' आणि 'हरिपदरति' हा त्या फळांतील रस प्राप्त होतो. धर्माचरणाने उत्तम प्रकारचे वैराग्य आपोआप प्राप्त होते आणि योगामुळे ज्ञानप्राप्ती होते, पण भगवत्‌भक्तीशिवाय ज्ञान टिकू शकत नाही. 'विरतिस धर्म, योग दे ज्ञाना' जे चोरी करतात, जुगार खेळतात, परधन आणि परनारी यांचे अपहरण करतात, आईवडिलांना मानत नाहीत, साधूंना सन्मानाने न वागविता त्यांच्याकडून सेवा घेतात, ते मनुष्य नसून राक्षस आहेत.

सकाम भक्ती निषिद्ध नाही, पण भक्तीत व्यभिचार (अन्याश्रय) निषिद्ध आहे. इतर देवतांची पूजाअर्चा केली तर त्यांच्याकडे इष्ट देवतेची भक्ती हेच एक मागणे मागावे. कलियुगात नामासारखे दुसरे सोपे साधन नाही. रामापेक्षाही रामनाम श्रेष्ठ आहे. मात्र ते नाम सद्‌भावाने घ्यावयास हवे. नाम आणि नामी यात भेद नाही. नामाच्या प्रभावानेच रामकृपा होते. राम सन्मुख होण्यात जे सुख आड येते ते सुख नव्हेच. सर्व जग हे स्वप्नवत्‌ असून एक हरिभजन हेच खरे आहे. शठासी विनय, कुटिलासी प्रीती ही ऊखर भूमीवरील वृष्टीप्रमाणे व्यर्थ ठरतात. इत्यादि किती म्हणून लिहावे? राजधर्म, गृहस्थधर्म, यतिधर्म, वानप्रस्थधर्म सेवकधर्म, पुत्रधर्म, मित्रधर्म सर्वांतील महत्त्वाच्या गोष्टींबद्दल विविध व्यक्तींच्या द्वारे तुलसीदासांनी अचूक मार्गदर्शन केले आहे. एकही क्षेत्र त्यांनी मोकळे सोडलेले नाही. यावरून त्यांच्या बहुमुखी प्रतिभेचा प्रत्यय येतो.



## ॥ आरती श्रीरामायणजीकी ॥

आरति श्रीरामायनजी की। कीरति कलित ललित सिय पी की ॥ धृ. ॥
गावत ब्रह्मादिक मुनि नारद। बालमीक बिग्यान बिसारद।
सुक सनकादि सेष अरु सारद। बरनि पवनसुत कीरति नीकी ॥ १ ॥
गावत वेद पुरान अष्टदस। छओ शास्त्र सब ग्रंथन को रस ।
मुनिजन धन संतन को सरबस। सार अंस संमत सबही की ॥ २ ॥
गावत संतत संभु भवानी। अरु घट संभव मुनि बिग्यानी।
ब्यास आदि कविबर्ज बरवानी। कागभुशुंडि गरूड के ही की ॥ ३ ॥
कलि मल हरनि बिषय रस फीकी। सुभग सिंगार मुक्ति जुबती की।
दलन रोग भव मूरि अमी की। तात मात सब बिधि तुलसी की ॥ ४ ॥

## ॥ आरती रामचरित्राची ॥

जय जय, जय जय आरति सुखकर रामचरित्राते।
सुखकर रामचरित्राते।
श्रवणे मनने पठणे गाने दे हरि मित्राते ॥ धृ. ॥
शंकर, मानसिं रचिले, पावे हिमगिरी कन्या ते।
काकुभुशुंडी याज्ञवल्क्य मुनि, लोमश घटजाते।
नरहरी तुलसीदासा पासुनि गंगादासाते।
कृपाळु होऊनि तेणे दिधले ईश्वर प्रज्ञाते।
'कमा' सि दिधले सदगुरु प्रज्ञे, हितकर 'मानस' ते।
वंदुनि त्यांच्या शिवपद कमला, आरति मी गाते ॥ १ ॥

# परिशिष्ट

| *तुलसीदासजी के विशेष अध्ययन के लिये पठनीय पुस्तकें* | | *लेखक* |
|---|---|---|
| १. | श्रीरामचरित मानस | महाकवि तुलसीदास |
| २. | विनयपत्रिका | " |
| ३. | गीतावली | " |
| ४. | कवितावली | " |
| ५. | कृष्णगीतावली | " |
| ६. | दोहावली | " |
| ७. | जानकी-मंगल | " |
| ८. | पार्वती मंगल | " |
| ९. | रामाज्ञा-प्रश्न | " |
| १०. | बरवै रामायण | " |
| ११. | वैराग्य-संदीपिनी | " |
| १२. | रामलला-नहछू | " |
| १३. | तुलसीदास (तृतीय संस्करण) | डॉ. माताप्रसाद गुप्त |
| १४. | तुलसी-दर्शन | डॉ. बलदेवप्रसाद मिश्र |
| १५. | मानसमें-रामकथा | " |
| १६. | मानस-मंथन | " |
| १७. | तुलसीदास और उनका युग | डॉ.राजपति दीक्षित |
| १८. | गोस्वामी तुलसीदास | डॉ. रामचंद्र शुक्ल |
| १९. | गोस्वामी तुलसीदास | श्री. श्यामसुंदर दास |
| २०. | मानस-दर्शन | डॉ.श्री. कृष्णलाल |
| २१. | तुलसीका घरबार | डॉ. रामदत्त भारद्वाज |
| २२. | तुलसीकी समन्वय साधना | श्री. व्यौहार राजेंद्रसिंह |
| २३. | मानसकी रामकथा | श्री. परशुराम चतुर्वेदी |
| २४. | तुलसीके चार दल | श्री सद्‌गुरुचरण अवस्थी |
| २५. | तुलसीदास और उनका साहित्य | डॉ. विमलकुमार जैन |
| २६. | मानसकी रूसी भूमिका | डॉ. केशरीनारायण शुक्ल |
| २७. | थेअरी ऑफ तुलसीदास | डॉ. जे. एन्. कार्पेंटर |
| २८. | फ्रेडरिक पिनकाट | अंग्रेजी अनुवाद |
| २९. | एटकिन्स | " |
| ३०. | प्रोफेसर बारान्निकोव - यांचा रुसी अनुवाद | |
| ३१. | बेल्जियमचे | डॉ. कामिल बुल्के |
| ३२. | आस्ट्रियाचे | श्री. जॉर्ज सिब्रा उपनाम श्रीराम |
| ३३. | महाप्राण निराला यांचे 'तुलसीदास' | |
| ३४. | श्री. अमृतलाल नागर यांचे 'मानसका हंस' | |
| ३५. | तुलसी व्यक्तित्व और विचार (१९५२) हरिकृष्ण अवस्थी, विद्यामंदिर लखनौ, उ.प्र. | |
| ३६. | चंद्राकुमारी हंडू, तुलसीदास १९६४, ओरीयंट लाँगमॅनस्, बाँबे. | |
| ३७. | डॉ. राजाराम रस्तोगीद्वारा 'तुलसी जीवनी और विचार धारा' | |
| ३८. | आचार्य चंद्रवली पांडेय कृत 'तुलसीकी जीवन भूमि' | |
| ३९. | बाबू - शिवनंदन सहाय 'गोस्वामी तुलसीदास' | |
| ४०. | श्री. रामचंद्र द्विवेदीद्वारा 'तुलसी साहित्यरत्नाकर' | |

४१. श्रीरामदास गौड द्वारा लिखित 'तुलसी साहित्यकी भूमिका'
४२. डॉ. सरनामसिंह शर्माद्वारा 'हिंदी साहित्यपर संस्कृत का प्रभाव'

## संदर्भग्रंथ सूची


१. तुलसीदासका घरबार - लेखक - रामदत्त भारद्वाज
प्रकाशक - नॅशनल इन्फरमेशन एण्ड पब्लिकेशन्स
२. हिंदी पद-परम्परा और तुलसीदास - डॉ. रामचंद्र मिश्र
हिंदी साहित्य संसार, दिल्ली ६, प्रथमसंस्करण जुलई १९६२
३. रामचरितमानस (साहित्यिक मूल्यांकन) सुधाकर पांडेय
प्रकाशक - अरविंदकुमार, राधाकृष्ण प्रकाशन, दिल्ली ६, १९७२
४. मध्यकालीन हिंन्दी साहित्य और तुलसीदास - डॉ. भगीरथ मिश्र
मध्यप्रदेश शासन साहित्य-परिषद भोपाळ १९६९
५. तुलसी वाङ्मय विमर्श डॉ. कुंदनलाल जैन - रामचरितमानस
प्रचार समिती-बरेली (उ.प.) प्रथमसंस्करण १९७४
६. तुलसीदास-एक विश्लेषण - आकाशवाणी प्रकाशन विभाग
द्वितीय संस्करण जाने. १९६१ निदेशक प्रकाशन विभाग, दिल्ली ६ द्वारा प्रकाशित.
७. गोस्वामी तुलसीदास : व्यक्तित्व : दर्शन : साहित्य - डॉ. रामदत्त भारद्वाज, भारती साहित्य मंदिर, फत्वारा, दिल्ली १९६२.
८. श्रीरामचरित मानस गूढार्थ चंद्रिका, प्रस्तावना खंड-लेखक-प.प. प्रज्ञानानंद सरस्वती-मानसगूढार्थचंद्रिका प्रकाशनमंडळ - इस्लामपूर.
९. भक्तशिरोमणि गोस्वामी श्री. तुलसीदास महाराजयांचे अल्पचरित्र - लेखक प.प. स्वामी प्रज्ञानानंद सरस्वती-प्रकाशक श्री. लालचंद हिमतमल कटारे (चास-कमान-पुणे) १९४६
१०. तुलसी-ग्रंथावली-तृतीयखंड-प्रथम आवृत्ति, १० जून सन १९७३ अखिल भारतीय विक्रम परिषद काशी (संपादक-मंडळ) द्वारा.
११. 'तुलसीदास और उनका साहित्य' - डॉ. विमलकुमार जैन प्रकाशक - साहित्यसदन देहरादून
१२. 'तुलसीदास' (एक समालोचनात्मक अध्ययन) लेखक - श्री. माताप्रसाद गुप्त-प्रयाग विश्वविद्यालय हिंदीपरिषद सन १९४६, जुलई द्वितीय संस्करण.
१३. तुलसी-प्रतिभा-संपादक डॉ. इंद्रनाथ मदान - लोकभारती प्रकाशन इलाहाबाद, तीसरा नया संस्करण इ.स. १९७१
१४. गोस्वामी और उनका काव्य - श्री. त्रिपाठी रामनरेश दिल्ली १९५३
१५. उत्तरभारतकी संतपरंपरा - श्री. पर्शुराम चतुर्वेदी, अलाहाबाद १९३१
१६. गोस्वामी तुलसीदास - श्यामसुंदर दास, अलाहाबाद १९३१
१७. 'रामकथा' - श्री. बुल्के फादर कामिल , अलाहाबाद १८५०
१८. गोस्वामी तुलसीदास - श्री. भारद्वाज रामदत्त दिल्ली, १९६१
१९. 'तुलसीदर्शन' - श्री. मिश्र बलदेवप्रसाद, अलाहाबाद, १९३८
२०. 'तुलसी आजके संदर्भमें' - श्री. युगेश्वर अलाहाबाद १९६८
२१. 'तुलसी रामायन' - श्री. मिश्र भगीरथ, लखनौ १९५४
२२. गोस्वामी तुलसीदास - श्री. शुक्ल रामचंद्र, बनारस १९४९
२३. मराठी विश्वकोशखंड ७ पान ४२८ ते ४३१ (महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृति मंडळ मुंबई १९७७)
२४. महाराष्ट्रीय ज्ञानकोश - डॉ. श्री. व्यं. केतकर खंड १५ वा पुणे, १९२५, पृष्ठ १४०-१४१
२५. भारतीय संस्कृतिकोश - पंडित महादेवशास्त्री जोशी, खंड ४ था, पृष्ठ १५७ ते १६७




# आमची इतर प्रकाशने

*श्री परमपूज्य प्रज्ञानानंद सरस्वती स्वामी महाराज यांचे अप्रकाशित वाङ्मय प्रसिद्ध करावे हा प्रधान हेतू मनात ठेवून १९८८ साली 'श्रीरामचरितमानसप्रेमी मंडळ' डोंबिवली या नावाने सार्वजनिक विश्वस्तसंस्था (रजि. नं. ए - १२१, ठाणे विभाग) अस्तित्वात आली असून या ट्रस्टतर्फे खालील पुस्तके प्रकाशित झाली आहेत.*

*सर्व पुस्तके एकदम मागविणाऱ्यास टपालखर्च माफ केला जाईल*

| *पुस्तके* | *किंमत* |
|---|---|
| **श्रीरामचरितमानस (मराठी समवृत्त समछंद अनुवाद)**<br>श्री पू. स्वामी प्रज्ञानानंद सरस्वतीकृत | १२० - रु. |
| **मानस गूढार्थ चंद्रिका (अरण्यकांड) (मराठी)**<br>लवकरच प्रकाशित होईल | १०० रु. |
| **श्रीरामनामवंदना (हिंदी)**<br>श्रीगोस्वामी तुलसीदासकृत<br>भाष्यकार : पू. प्रज्ञानानंद सरस्वती | ३६ - रु. |
| **संगीत गीता समश्लोकी**<br>आवृत्ती दुसरी (मराठी) | १२ - रु. |
| **मानस गूढार्थ चंद्रिका (किष्किंधाकांड मराठी)** | ६० - रु. |
| **मानस गूढार्थ चंद्रिका (किष्किंधाकांड हिंदी)** | ५० रु. |
| **मानस गूढार्थ चंद्रिका (सुंदरकांड हिंदी)** | ४० - रु. |
| **स्वामी प्रज्ञानानंद सरस्वती**<br>संग्राहक : डॉ. श्रीमती कमल वैद्य | १५ - रु. |
| चूडालाख्यान (हंसराज स्वामीकृत) | २५ रु. |
| मानस गूढार्थ चंद्रिका (अरण्यकांड हिंदी) | १०० रु. |
| हनुमान चालिसा (मराठी) व इतर स्तोत्रे | ५ रु. |
| प्रज्ञानांजली (नित्यभजन संग्रह) | ५ - रु. |


## श्रीरामचरितमानसप्रेमी मंडळ

[illegible]

डोंबिवली (पूर्व) ४२१ २०१.